


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# दीपावली

साहित्य-कला-संगम

ऑक्टोबर १९६८ * वर्ष २४ वे * मूल्य १॥ रु.

## श्रेयनामावली–



टे. नं ३५७७६५
Gram : DALALART

दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

* संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिग प्रेस, २०१ खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४. येथे छापले. या प्रतीस किमत १॥ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. प्रकाशित चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत. Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN 1612/57




**दलाल आर्ट स्टुडिओ**
४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४
टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :
३५७७६५ DALALART

० **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रू. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी रू. १६**

० **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

० **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

० **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

० **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.
० **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी, मेनरोड मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.

# एक आवश्यक व्रत —

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर देश स्वयंपूर्ण होण्यासाठी राष्ट्रीय सरकारने विविध योजना आखल्या आणि त्या कार्यवाहीत आणल्या. देशाचे उत्पादन वाढले, पण त्याबरोबरच लोकसंख्याही वाढत चालली. त्यामुळे उत्पादन वाढीचा अपेक्षित लाभ मिळून देशात सुख आणि समृद्धी निर्माण करण्याची रंगविलेली स्वप्न प्रत्यक्षात आणणे अशक्यप्राय झाले. भारताची लोकसंख्या १९५१ मध्ये ३६ कोटी होती ती आज ५३ कोटींवर गेली आहे. जननसंख्येचे सध्याचे प्रमाण कायम राहिले तर पुढील तीस वर्षांच्या अवधीत भारताची लोकसंख्या शंभर कोटींवर जाईल असा तज्ज्ञांचा अंदाज आहे.

लोकसंख्यावाढ हा केवळ भारताचाच प्रश्न नसून जगातील इतर देशांचीही तीच समस्या आहे. सुसंपन्न देशांमध्ये तिची तीव्रता अद्यापि प्रखरतेने जाणवत नाही इतकेच! भारतासारख्या विकसनशील देशामध्ये या समस्येचे स्वरूप उग्रतर झालेले आहे. म्हणून झपाट्याने वाढणाऱ्या लोकसंख्येला आळा घालण्यासाठी आणि जननाचा वेग कमी करण्यासाठी शास्त्रशुद्ध मार्गांचे अवलंबन करणे आवश्यक झाले आहे. त्यासाठीच सरकारने कुटुंब नियोजनाचा प्रसार करण्याचे कार्य नेटाने करण्याचे ठरविले आहे. दोन अगर तीन मुलांपेक्षा अधिक मुले होऊ द्यावयाची नाहीत असे देशातील सर्व जोडप्यानी ठरविले तर सध्याचे दरहजारी ४१ इतके असलेले जननप्रमाण २५ पर्यंत खाली येईल अशी अपेक्षा आहे.

कुटुंब नियोजनाचा प्रचार गेली काही वर्षे आपल्या देशात चालू आहे. प्रारंभी त्यावर बरीच टीका झाली, अनेक आक्षेप घेण्यात आले, पण या आवश्यक गोष्टीचा प्रचार न थांबवता सरकारने त्याचे लोण खेड्यापाड्यापर्यंत नेऊन पोचविले आहे. खेड्यातील अज्ञानी जनताही आता याबाबतीत जागृत होऊन विचार करू लागली आहे आणि हळूहळू कुटुंब नियोजनाचे महत्त्व खेड्यातील लोकाना पटू लागले आहे. तथापि नेहमीच्या प्रचारावर समाधान न मानता अधूनमधून कुटुंब नियोजनविषयक मोहीम आखून त्याद्वारे कुटुंब नियोजनाचा प्रचार अधिक जोरदारपणे करण्याचे सरकारचे धोरण आहे. त्याला अनुसरून दि. १६ ते ३० सप्टेंबरपर्यंत सरकारने कुटुंब नियोजन पंधरवडा साजरा करण्याचे ठरविले आहे.

या पंधरवड्यात सुरू झालेल्या कुटुंब नियोजनाच्या मोहिमेचा एक भाग म्हणून 'दीपावली'च्या या अंकात कुटुंब नियोजनविषयक एक खास पुरवणी प्रसिद्ध करण्यात येत आहे, त्याकडे आम्ही वाचकांचे लक्ष वेधू इच्छितो. सरकारचे कुटुंब नियोजनविषयक धोरण एक आवश्यक 'व्रत' म्हणून जनतेने स्वीकारावे आणि राष्ट्रीय पातळीवर चालू असलेल्या कुटुंब नियोजनविषयक कार्यक्रमाला सर्व प्रकारचे सहकार्य द्यावे असे आम्ही नम्रतापूर्वक आवाहन करीत आहो.

—संपादक

## वाचकांना विनंती

'दीपावली'चा ऑक्टोबर १९६८ चा हा अंक छपाईवावतच्या काही यांत्रिक आणि तांत्रिक बिघाडामुळे केवळ नाईलाजाने कमी पानाचा द्यावा लागत आहे, याबद्दल आम्ही दिलगीर आहोत. यावेळची भरपाई आम्ही येत्या म्हणजे दिवाळी अंकात करून देऊ असे आश्वासन देतो. वाचकानी नेहेमीप्रमाणे सहकार्य द्यावे अशी विनंती आहे आणि ते मिळेल अशी खात्री आहे–

—संपादक








'आता लाह्या फुटत नाहीत' या माझ्या इशाऱ्यांचा मतितार्थ त्याच्या ध्यानी आला नि त्याच्या चेहऱ्यावरचे स्मित मावळले. स्मिताची जागा भीतीने घेतली नि त्याने रुमालाने कपाळावरचा घाम पुसला— मे १९६८ च्या अंकातील 'युद्धस्य रम्य कथेच' हा उत्तरार्ध......

# [illegible] देव तारी!

**सुराबायात** विल्सन (विली) च्या कंपनीला मदत पोहोचविल्यानंतर दुसरे महायुद्ध संपलेच असल्याने प्रत्यक्ष युद्धाचे असे काम नव्हतेच.

मध्यंतरी १–१॥ वर्षे मी कांगोत काढली. त्याकाळी वर्चस्व मिळविण्यासाठी ह्या देशात दोन गटांमध्ये एक छोटेखानी युद्धच पेटलेले होते. बंडाळी विशेषतः कटांगा प्रांतातच मर्यादित होती. त्या प्रांतातील अॅल्बर्टव्हिल शहरी त्या भागातील यूनोच्या फौजावर मी कमांडर म्हणून नियुक्त होतो त्यावेळची गोष्ट. अॅल्बर्टव्हिल पासून ८०–८५ मैलांवर कटांगी सैन्याचे कपोना नावाच्या गावी एक बरेच मोठे ठाणे होते. तेथून ते लोक माझ्या हाताखालच्या सैन्याला वारंवार उपद्रव करीत असत. एक दिवस त्या ठाण्याची हवेतून टेहळणी करण्याचा मला आदेश मिळाला व मी विमानतळावर हेलिकॉप्टरमधून निघायच्या तयारीत होतो. मी त्यात बसणार इतक्यात माझ्या हाताखालचा एक तरुण ऑफिसर . . . रमेश . . . मला म्हणाला, "सर, तुमची हरकत नसेल तर मी पण बरोबर येतो." सोबत होईल आयतीच या विचाराने त्याला चल म्हटले.

अर्ध्या एक तासात आम्ही कपोनावर पोचलो व अधिक चांगले दिसावे म्हणून मी पायलटला इशारा दिला की, हेलिकॉप्टर थोडे खाली ने. त्याने ते तसे हजार एक फूट खाली नेले. नीट पाहाता यावे म्हणून कॅबिनचा दरवाजा उघडाच ठेवलेला होता व डोळ्याना दुर्बिण लावून मी खाली जमिनीवर टेहेळणी करू लागलो. रमेशने पण माझे अनुकरण केले. दार उघडेच ठेवल्याने कॅबिनमध्ये वाऱ्याचा गोंगाट व एंजिनचा आवाज बराच मोठ्याने येत होता. रमेश माझ्यापासून तीन हातांवरच बसलेला होता तरी आम्हाला एकमेकांचे बोलणे ऐकू येत नव्हते. म्हणून जे काय नजरेस पडत होते ते आम्ही एकमेकाना नोटबुकमध्ये लिहून दाखवीत होतो.

हेलिकॉप्टर घिरट्या घालीत होते व आम्ही टेहळणी करण्यात दंग होतो. येवढ्यात कॅबिनमध्ये एक नवीनच आवाज मला ऐकू आला. लाह्या फुटाव्यात तसा तो आवाज होता. हेलिकॉप्टरच्या बाहेरच्या बाजला व आमच्या चारी बाजूला लाह्यांचा घाणा एकदम फुटल्यासारखे भासू लागले. मी व रमेशनी एकमेकांकडे बघितले. तो आवाज कसला असावा हे मी ताडले होते पण तो तरुण छोकरा

**ब्रिग्रे. वि. ल. साठे**

कसला आवाज असावा याचा शोध घेण्यासाठी कॅबिनच्या भिंतीच न्याहाळीत होता. थोड्याच वेळात नोटबुकमध्ये काही लिहून त्याने ते माझ्यापुढे केले. मी वाचले "सर, हे हेलिकॉप्टर फार जुने दिसते आहे. मोटर सायकलच्या एंजिनसारखा कसा फटफट आवाज येतोय!"

मी त्याच्याकडे पाहून स्मित केले व खूपच लाह्या फुटू लागल्याने पायलटला





अनुक्रमणिका

इशारा दिला हेलिकॉप्टर उंचावर घे व माघारी फीर. आम्ही उंचावर जाऊन मागे फिरलो. रमेश स्तंभित होऊन माझ्याकडे पहातच राहिला. त्याने फिरून नोटबुकमध्ये लिहिले, "कपोनातील ती तोफ तुम्ही पाहिलीत का? ती नीट दिसावी म्हणून हेलिकॉप्टर थोडे आणखी खाली नेऊ या असे मी सुचवणार होतो. पण आपण तर उंचच गेलो व आता तर मागेच फिरलो आहोत. तो कसला आवाज होता?" मला सस्मित पाहून त्याच्या पण चेहऱ्यावर स्मितच झळकत होते व प्रश्नार्थक मुद्रेने तो माझ्याकडे पाहत होता.

एव्हाना आम्ही कपोनापासून बऱ्याच अंतरावर आलो होतो व फिरून फक्त वारा अन् एंजिनचेच आवाज आमच्या कानांवर येत होते. मी रमेशकडे बघून उजव्या हाताच्या बोटाने रायफलचा चाप ओढण्याची खूण केली व कानाला हात लावून आता लाह्या फुटत नाहीत असा त्याला इशारा केला. दोनचार सेकंदातच माझ्या इशाऱ्याचा मतितार्थ पूर्णपणे त्याच्या ध्यानात आला व त्याच्या चेहऱ्यावरचे स्मित पार मावळून त्याच्या जागी भीतीची छटा पसरली! रमेशने खिशातून रुमाल काढून आता कपाळावरचा घाम पुसला. त्या कसल्या लाह्या फुटत होत्या हे ध्यानात आल्यावर माझ्या पण तोंडचे पाणीच पळाले होते. व टेहळणी पुरी न करताच मी घाईतच पायलटला परतण्याची खूण केली होती, पण आता चेहऱ्यावर बळेच हसू आणून मी रमेशला खूण केली की आता काही काळजी नाही!

आणखी सुमारे २०-२५ मिनिटांनी हेलिकॉप्टर अॅलबर्टव्हिलच्या विमानतळावर उतरले आणि आम्ही दोघे व पायलट पण खाली उरलो. तिघांनीही हेलिकॉप्टरची पाहणी केली. त्याच्या वरच्या पंख्याच्या (Rotor) च्या तिन्हीही पात्याना दोन दोन तीन तीन गोळ्या लागून भोके पडलेली होती; तिघांच्याही मनात त्या क्षणी इकच विचार चमकला असावा, "जर का वरचा पंखा बंद पडता तर हेलिकॉप्टर जमिनीवर कोसळले असते व आम्ही . . . !" आमच्या त्या क्षणीच्या भावना इथे शब्दात उतरविणे शक्यच नाही, परंतु लहानपणी वडिलानी विशेष जोर देऊन पाठ करायला लावलेला श्लोक अत्यंत तीव्रतेने आठवला . . ." "जया देव तारी . . ."

## जय आणि विजय

जयराम व विजयसिंग एकाच गावचे रहिवाशी. बालवयापासून एकत्रच वाढले. शेतावर-माळावर हिंडले खेळले आणि वयात आल्यावर एकाच दिवशी पलटणीत भरती झाले. रिक्रूट ट्रेनिंग संपवून त्यांच्या सुदैवाने दोघेही एकाच बटालियनला पाठविले गेले व योगायोगाने तिथे एकाच कंपनीत त्यांची नेमणूक झाली. लवकरच त्या कंपनीत ही जोडी जय-विजय या टोपण नावाने ओळखली जाऊ लागली. गेल्या महायुद्धाची तीन वर्षे त्यानी सतत ब्रम्हदेशात आघाडीवर काढली. व आता ऑगस्ट १९४५ मध्ये दोघेही सुखरूप आपल्या गावी एक महिन्याच्या रजेवर आलेले होते. ते दोघे आघाडीवर असताना त्यांच्याविषयी सारखीच काळजी वाटत असल्याने दोघांच्या कुटुंबांचा घरोबा खूपच दाट वाढलेला होता. त्याचे रूपांतर ऑगस्ट १९४५ मध्ये जयच्या बहिणीशी विजयचे लग्न ठरण्यात झाले आणि दोन्ही कुटुंबे अधिकच जवळची झाली. जपानने शरणागति पत्करली होती तरी पण त्याने युद्धात व्यापिलेल्या आग्नेय आशियातील निरनिराळ्या देशात पुनरपि शांतता प्रस्थापित करायला अजून सहज ८।१० महिने तरी लागतील असा दोस्त राष्ट्रांचा अंदाज होता. तेव्हा विजयचे लग्न मे १९४६ च्या आसपास उरकावे असा बेत ठरला.

ब्रम्हदेश, मलाया, जाव्हा व सुमात्रा या देशात जागोजागी विखुरलेल्या जपानी सैनिकांच्या तुकड्या एकत्र जमा करून त्याना निःशस्त्र करून स्वदेशी परत पाठविणे, या देशात वापरासाठी जागोजागी जमविलेल्या जपानी युद्ध सामुग्रीच्या साठ्यांची माहिती गोळा करून, ते साठे शोधून काढून एकत्र जमवून त्यांची विल्हेवाट लावणे व या चारी देशातील युद्धाआधीच्या राजवटीचे पुनर्वसन करणे वगैरे महत्त्वाच्या कामगिरीवर दोस्त सैन्ये आता वापरली जाणार होती. त्यासाठी जय-विजयची बटालियन आता जाव्हात रवाना झाली.

जाव्हात निरनिराळ्या ठिकाणी कामगिरी बजावून एप्रिल १९४६ मध्ये जयविजयची बटालियन बटेव्हियात आलेली होती. २१ एप्रिलला विजय लग्नासाठी रजेवर भारताकडे रवाना होणार होता! २० तारीख उजाडली. तो दिवसभर विजय तयारी करण्यात गुंतलेला होता. संध्याकाळपर्यंत सर्व आटोपून साडेसातच्या सुमारास तो आपल्या चारपाच मित्रांसकट बराकीतील जिन्याच्या पायऱ्यांवर गप्पा मारीत बसला होता. जय त्यावेळी गार्ड ड्यूटीवर होता आणि ८ वाजता ड्यूटी संपल्यावर त्या कंपूत सामील होणार होता. विजयला त्याचे मित्र त्या संध्याकाळी स्पेशल जेवण देणार होते. त्याला लग्नाचे कारण तर होतेच पण रजेचेही होते.

वर्षभरात एकदाच मिळणाऱ्या रजेवर, इतक्या दुरून व विशेषतः परदेशातून गावी परतायचे म्हणजे सैनिकांना ती एक अपूर्व पर्वणीच वाटते. बायकामुले, इतर आप्तेष्ट व गावच्या मित्रांपासून दुरावलेला, भरीला परदेशात युद्धावर "गेला दिवस सुखाचा, उद्या जगतो की मरतो" या अनिश्चितपणाच्या मानसिक हिंदोळ्यावर हेलकावे घेणारा सैनिक किती तीव्र आशेने या वार्षिक रजेची कशी चातकासारखी वाट पाहात असतो हे इथे शब्दात उतरविणे जमणार नाही व सांगून त्याची कोणालाही

कल्पना पण येणार नाही. त्याला "जावे त्याच्या वंशा . . ." हेच खरे ! अशा-वेळी आसपासच्या गावच्या शिपायाना-देखील रजेवर जाणारा सैनिक अगदी नजीकचा नातेवाईकच वाटतो. विजय त्याच स्थितीत होता आणि त्याच्या गावच्या तेव्हा विजयच्या गावाच्या आस-पासच्या गावातील सैनिक देखील त्याला येऊन भेटत होते व लग्नाच्या अभि-नंदनाबरोबरच त्याला आपापल्या गावी जाऊन आपल्या "पाहुण्याना"व कुटुंबियाना देण्यासाठी त्याचेजवळ निरोप ठेवीत होते. विजय व त्याचे मित्र यांच्या गप्पा आणि थट्टामस्करी याना रंग चढला होता. आठ वाजून दहा एक मिनिटांनी ड्यूटी आटोपल्यावर जय पण तिथे आला. ड्यूटीच्या जागेवरून सरळ तिथेच आल्याने त्याच्या हातात रायफल पण होती व वर जाऊन बराकीत ती परत ठेवायच्या आधी तो या कंपूजवळ थब-कला. रायफल जिन्याच्या कठड्याला टेकवून ठेवून त्याने विडी शिलगाविली व त्या मित्रांच्या गप्पात सामील झाला.

त्यांच्या संभाषणाचा ओघ काही वेळाने विजयच्या होऊ घातलेल्या लग्नाकडे वळला व भावी मेव्हणे लग्न कधी होणार, कुठे व कसे होणार, काय काय तयारी झालीय वगैरेबद्दल बोलू लागले. अधून-मधून त्यांचे मित्र पण त्यात भाग घेत होते. बोलता बोलता एकजण थट्टेत म्हणाला, "जय लेका, तुला आता विज-यची वडदास्त नीट ठेवायला हवी हं ऽ. नाही ठेवलीस तर तो तुझ्या बहिणीवर राग काढील सगळा." ते ऐकून सर्वानाच हसू आले. हसणे आवरीत जय म्हणाला, "ए विजया, लेका, बघ हं, माझ्या बहि-णीला उगीचच त्रासबीस दिलास तर–वच्चू माझ्याशी गाठ आहे विसरू नकोस." यावर आणखी एक हशाची लहर उठली. दुसरा एक मित्र म्हणाला, "विजयने तुझी पर्वा न करता तिला त्रास देणं चालूच ठेवलं तर रे ?" जय उत्तरला, "तर-तर. मी दुरुस्त करीन त्याला–तरी बी नाय सुधरला तर ही रायफल आहेच की माझ्याजवळ–अश्शी रोखीन त्याच्यावर" म्हणत त्याने चेष्टेने आपली रायफल उचलून विजयवर रोखली व तिचा चाप विनोदातच दाबला.

जय चाप दाबतो तो मोठा बार झाला अन् दुसऱ्याच क्षणी छातीत गोळी लागून विजय रक्तबंबाळ झाला व त्याचा देह त्या पायऱ्यांवर कोलमडला ! छातीतच गोळी बसल्याने एक दोन सेकंदातच सर्व आटोपले. जयच्या विनोदाने व कृतीने पिकलेला हशा एकदम थांबला. ते सर्वच मित्र सुन्न झाले ! काय व कसे झाले हे कोणालाच उमगेना, अन् वेड्यासारखे ते एकमेकांकडे, जय व त्याच्या हाता-तील रायफलीकडे आणि विजयच्या रक्तबंबाळ मृत देहाकडे पाहतच राहिले. जय दिङमूढ होऊन आपल्या रायफलीकडे व विजयच्या शवाकडे आळीपाळीने पाहत स्तब्ध उभा राहिला ! सर्वजण दगडाच्या मूर्तीसारखे जागच्या जागी खिळून गेले.

एक मिनिट पण गेले नसेल येवढ्यात काय झाले कोणी गोळी उडवली विचारीत बराकीतले इतर सैनिक तिथे धावून आले व विजयकडे पाहून हातात रायफल धरून उभ्या असलेल्या जयला चार पाच जणानी धरले. तेव्हा तो भानावर आला व हातातली रायफल टाकून "विजय–हे मी काय केलं– माझ्या बहि-णीचं सौभाग्य–त्याचा नाश माझ्याच हातून झाला. हाय रे देवा, हे काय झालं . . . . . ." म्हणत त्याने ओक्साबोक्शी रडायला सुरुवात केली. लवकरच तिथे आणखीही शिपाई, हवालदार वगैरे जमा झाले व जयला क्वार्टर गार्डच्या कैद्यांच्या कोठडीत बंद करण्यात आले.

दुसऱ्या दिवशी सकाळी मला ऑफिस-मध्ये सुभेदार मेजरकडून वरील घटनेची वर्दी मिळाली. मी कमांडिंग ऑफिसर होतो तेव्हा या बाबतीत शहानिशा करणे, जयची कोर्ट मार्शल करणे आणि योग्य ती शिक्षा त्याला ठोठावणे हे माझे कर्तव्य होते. कोर्ट मार्शल घेताना जय सारखा रडतच होता. मी जेव्हा त्याला विचारले की झाल्या प्रकाराबद्दल अगर स्वतःच्या बचावाबद्दल तुला काही कोर्टापुढे मांडा-यचं अगर सांगायचं आहे का, तेव्हा तो हुंदके देत देतच मोठ्या मुष्किलीने उत्त-रला, "साहेब, ड्यूटी संपवून आल्यावर मी रायफलमधील गोळी काढायला कसा विसरलो मला माहीत नाही. माझ्या बहि-णीचं सौभाग्य मी या माझ्याच हातानी घालवलं. तिच्या जिंदगीचा नाश केला. साहेब, मला वाटेल ती शिक्षा करा. मी विजयचा जीव . . . . . तुम्ही माझा जीव घ्या. आता मी घरी कसा जाऊ अन् माझ्या बहिणीला तोंड तरी कसं दाखवू . . ."

जयच्या हातून रायफलीसारखे शस्त्र निष्काळजीपणाने वापरले जाऊन–थट्टेत का होईना, त्याने ते आपल्या सवंगड्या-वर रोखले होते हाच आधी गुन्हा होता. तशात विजयचा जीव पण गेला होता. तेव्हा जयला शिक्षा ठोठावणे अपरिहार्यच होते. परंतु सर्व घटना कशी घडली व विनोदाचा शोकात कसा अंत झाला हे नीट कळून चुकल्यावर जयला त्या दिवशी शिक्षा सुनावताना पोटात उठलेला गोळा अजूनही–वीस बावीस वर्षांनंतर देखील–मला बेचैन करतो व कधीकधी जयचे ते करुण दृश्य माझ्या डोळ्यांपुढे उभे राहून त्याना ओलसरपणा आणते यात नवल काय ?

● ● ●



अनुक्रमणिका






'मालकानं स्वतःचा माल स्वतःच विकत घेऊन त्याची किंमत गिऱ्हाइकाच्या पदरात टाकणं असा उलटा व्यवहार कोणी पाहिला आहे का!' असा सवाल हैबतीनं सोज्याला विचारला. बिचारा सोज्या...



# शेंदऱ्या आंबा

— द. स. काकडे



**दिवठाण्यावरील** दिवा पडाळभर धूर वकत होता. तिथं उखळाजवळच सोजू पायाला तिडा घालून बसला होता. शून्य नजरेनं दिव्याच्या काळ्यामिचूक धुराकडे पहात होता. रुपी त्याच्या नजदिकच बसली होती. पडाळीच्या उघड्या कवाडातून ती देवनदीकाठच्या मळईच्या वावरातील शेंदऱ्या आंब्याकडे भकास नजरेनं पहात होती. रात्र बरीच झाली होती तरी चांदणं चांगलं पडलं असल्यानं ते झाड चांगलं टहाळ दिसत होतं.

पंधरा दिस झालं, सोजूनं आपल्या राहीचं लगीन कसंबसं पार पाडलं होतं. सांगावा आल्यानं सोजूनं कालच तिला बोटा एस्टी स्टँडवर एस्टी पकडून तिच्या नवऱ्याच्या इकडं, साकूरमांडयाला नेऊन घातलं होतं. जावयाशी दोन शब्द बोलायचं झाल्यावर सोजू तिथं थांबलाच नाही. माहुलच्या फाट्यावर एस्टी पकडून तो चांगला गडात पडता आपल्या आंबीला फिराडू झाला होता.

एकुलती एक लाडकी लेक, राही आज दोन रोज पडाळीत नाही, म्हणून सोजू रुपीला काही सुचत नव्हतं. सारी पडाळ त्याना सुनीसुनी वाटत होती. म्हणून ती दोघं अशी कामधाम न करता हातपाय जोडून बसली होती. तेही गचुऱ्याखाली आनपाणी न सरकावता. काय बोलावं ?

'अग राह्यच्या आय.'

'काह्य व ?' रुपीनं शेंदऱ्या आंब्याकडे लावलेली नजर तशीच ठेवीत म्हटलं.

'आज वी तुपल्याला काह्य खयापेयाचं कनाह्य ?'

नाह्च व, मपल्याला व काह्च खवावं वाटत नाह्च, की पेवावं वी वाटत नाह्च.

'माहं बी तुह्यागत झालंय् पक्.'

'मंक् अन्ता व ?'

'मंकाह्य, अत्ता मपल्याच्यानं नाह्य बसून राव्हत. मी भुयला पडतो.'

'मंक् हातरुन करून देव?'

'पह्य तुला उठवत आसन् त.'

रुपीला खरं म्हणजे उठायचं जीवावर आलं होतं. पण घरधन्याला भुयलाच कसं पडू द्यायचं? म्हणून तिनं लय कोंधूळ बसल्यानं उधय लागलेलं बूड चाळवलं. अन् हाताचा रेटा देऊन ती उभी राहू लागली. पण आज दोन रोज पोटात काहीच नसल्यानं तिला उभं राहवेना. तव्हारी आल्यागत ती मटकन् खाली बसली. सोजू तिची ती करुण अवस्था पाहून कळवळला.

तिला सावरीत तो बोलला,

'तू वसवली निसूर. माहं हातरून मीच करतो.'

सोजू त्यावर उठला. वलनीवरची अंथरायची फाटकी गोधडी भुई न झाडताच तशी टाकल्यावर तो तिच्यावर आडवा झाला. अंगाचं मुटकुळं करून पडला. फिराडून रुपीला मायेनं बोलला,

'अग य राह्यच्या आय, तू बी पड य हितं. कव्हर डोळं फोडतीस जागून जागून.

'पर मला झोपच ययची नाह्य. ह्या कुशीवून त्या कुशीव व्हवं लागल. म्हून वसून ऱ्हाते....'

'तरी मी म्हणत व्हतो ...'

'काह्य त्य ?'

'राह्यचं लगीन फुडं कव्हा तरी करू म्हून. त तू घोड्याव आलीस. अत्ता पह्य तिच्याखिरी दोगाना बी करमाना.'

'पर मी कां उगा घोड्याव आल्ते ? पोरीला पदर आलाता.'

'ययना पदर. त्याचं काह्य ? राह्यली आसती राही आन्खी यक दोन साल.'

'मंक् लोकं काह्य बोल्ली असती ?'

'जग लाख बोलाना. त्येची फिकर आपल्याला काम्हून ?'

'पर अखीर त्यन्ला घाबरूनच पोरीचं लगीन करावं लागलं असतं, कनाह्य ?'

'बरं जावं दे वली त्या उचापती. अत्ता आपून द्वागं मराय मोकळं त झालो, कनाह्य ?'

'हुंऽहुंऽऽ, इक्त्या लौकर मरून कसं भागल आपल्याला ? अजून त पोरीचा सौंसार पगायचाय्. तिची नातवांडं नाह्य पर आपली नातवांडं, मह्य तिची पोरं तरी आपून आपल्या मांडीव ख्यळवाय् पायजी ना !'

रुपीच्या त्या भरल्या शब्दानं सोजूचं डोळं पाणवले. त्याच्यानं पुढं बोलवेना. म्हणून तो तसाच डोळे मिटून पडला. ती मात्र तशीच बसून राह्यली. पह्यल्यागत ती उघड्या कवाडातून देवनदीकाठच्या मळईच्या वावरातील शेंदऱ्या आंब्याकडं भकास नजरेनं पहात राह्यली. रुपीला रांगड्या हैवतीनं वळकावलेलं ते झाड कसंतरीच दिसू लागलं. त्या झाडाकडे डोळे फाडफाडून पहात असतानाच ती शहारली. चांगली मोठ्यान् किंचाळली.

'क्...कह्याग ?' ती किंचाळली म्हणून सोजू घाबरत बोलला,

'शेंदऱ्या आंब्याखाली काह्य तरी काळं काळं दिसतंया. वाय मान्सागत.'

'आसन हाडळबिडळ.'

सोजूनं केलेल्या त्या भलत्याच तर्कानं रुपी दचकली. नखशिखान्त थरारली. तरी उघड्या कवाडाजवळ मोठ्या धाडसानं गेली. तिथं उभी राहून धडधडत्या उरानं त्या आंब्याकडं पाहू लागली.

'अ्... अ् ... आवोऽ, अत्ता त रडण्याचा बी आवाज आयकू यतोय.'

'हाडळ खळत आसन ...' तो मोघमपंची बोलला.

'नाह्य व, रडणं वळखीचं वाटतंया. आपल्या राह्यगत ...'

तिच्या त्या बोलानं सोजू गोधडी फेकून तट्दिशी उठला. तिच्याजवळ आला. कान देऊन ऐकत राह्यला. आणि राहीचा रडण्याचा स्वर ऐकून तो चक्रावला. म्हणून तसाच उघडावाघडा आंब्याच्या रोखानं वावधानागत पळत सुटला. रुपीला मग कुठला दम ? ती त्याच्या पाठोपाठ.

'राह्य ... राह्य .... राह्यबाय् ...' घामाघूम झालेला सोजू शेंदऱ्या आंब्याखाली बसून रडणाऱ्या राहीला विचारत होता. बापाचा आवाज ऐकून राही रडायची थांबली. रुपी पुढं झाली. तिनं लेकीला मिठी मारली. झालं. बायाच त्या ... दोघींनी एकदम गळा काढला. सोजू बिचारा भ्रमिष्टागत तिथं उभा राह्यला. मग त्यानं मोठ्या मिनतवारीनं त्या दोघींना पडाळीत आणलं. दिव्याच्या उजेडात त्यानं राहीला निरखलं. तसा त्याचा चेहरा खर्रदिशी उतरला. तिच्या अंगावर चिंध्या झालेलं चोळी लुगडं होतं. पायात् तोडं नव्हतं. हातात गोठपाटल्या नव्हत्या. साधी फुटकी बांगडीसुद्धा नव्हती. हात भुंडच. गळ्यात लग्नातली बोरमाळ, गाठलं काहीच नाही. फक्त काळ्या पोतीचा एक तुटका पदर. कपाळी कुंकू नाही. सारं अंग हाणून मारून हिरं निळं झालेलं.

राहीला त्या अवतारात पाहून सोजूच्या अंतरातील पाणी ढवळलं गेलं. मोठ्या कणवेनं त्यानं तिच्या पाठीवरून हात फिरवला. तशी ती गुराढोरागत ओरडली. सोजूनं तिच्या पाठीवरची चोळी वर केली. बाप्पो, तिची पाठ हाणूनमारून धिरड्यागत झाली होती. ते सारं पाहून सोजूचं अंगच भैरावलं.

'पोरी, ह्य कह्याह्य ?' सोजू दुःखानं बोलला. पण राहीला बोलवेना. तिला सारखं रडू फुटत होतं.

थोड्या वेळानं मन हलकं झाल्यावर ती बोलली,

'काल त्वा मला मह्या नवऱ्यापं न्हयून घातलंस. त्याला तिथं तू बोल्लास, 'लग्नात अंदाण दिलेला शेंदऱ्या आंबा अत्ता तसा मिळणार नाह्य.' आन मंक तू तिथं न थांबता हिकं फिराडू झालास. त्यानं मह्या नवऱ्याचं डोकं सणाकलं. आन् आज सकाळच्याला त्यानं मला निरगुडीच्या वल्या फोकानं गुराढोरागत बडीवलं. आन् मला ह्या अवतारात हिकं पायपायीं हकाल्ल. शीर ताणून त्यानं मला ताकीद धिलीय, 'जव्हर तुहा बाप मला शेंदऱ्या आंबा अंदाण देत नाह्य तव्हर मी बी तुला नांदीत नाह्य. आन तशीच आलीस त तूह्ये आन मीह्ये.' बप्पा, तू माहं कसं करणार रे अत्ताऽऽ ...' राहीनं गळा काढला.

राहीचं ते सारं बोलणं ऐकून सोजच्या डोळ्यांसमोर लग्नाचा तो सारा प्रसंग उभा राह्यला ...

नवरीचं फळ भरायचं झालं होतं. तिला चांगलं चांगलं डाग घालण्यात आलं होतं. भारी किमतीचं फळाचं चोळी-








# प ★ ती ★ क्षा

'दीपावली' च्या दिवाळी अंकाची आपण 'प्रतीक्षा' करीत आहातच. त्याचप्रमाणे 'दीपावली'ने आयोजित केलेल्या कादंबरी-स्पर्धेच्या निर्णयाचीही आपण 'प्रतीक्षा' करीत आहात.

कादंबरी स्पर्धेचा (१) सौ. मालती बेडेकर, (२) श्री. अरविंद गोखले आणि (३) जयवन्त दळवी या तिघा मान्यवर परीक्षकानी एकमताने दिलेला निर्णय खालीलप्रमाणे आहेः

क्रमांक १ ....'प्रतीक्षा'— पारितोषिक रु. ६००

लेखक : श्री. प्रभाकर पेंढारकर

क्रमांक २ ....'परशुरामाची सांवली'—पारितोषिक रु. ४००

लेखक : श्री. रवीन्द्र पिंगे

उपरोक्त दोघाही लेखकांचे मनःपूर्वक अभिनंदन !

संपादक
'दीपावली'

लुगडं नेसवण्यात आलं होतं. नवरदेव नवरीला साकूरमांडयाला वरातीला घेऊन जायची वेळ तर नवरदेव रुसून बसला. काही केल्या जागचा उठेना. सोजू पुढं झाला. हात जोडून दीनवाणी बोलला,

'जावाय, समद्यांचं मानपान आम्या यवस्थित केलं. अत्ता तुमचं रुसणं कां त्य सांगा.'

'आमाला तुमी योक आंवा अंदाण द्यावा, वास. वाकी आमचं रुसणं कह्यामाठी वी नाह्य. हां, आन याक सांगून टतो, आंवा अंदाण म्हून मिळाला नाह्य त तुमची पोरगी तुमी संवाळा. आमी तसच निगतो ...''

सोजूचं देवनदीकाठच्या मळईच्या वावरातील शेंदऱ्या आंव्याचं झाड मोठ्या जोरात होतं. दरसाल त्याला भलतीच कैरी लागायची. ह्याही वर्षी झाड कैरीनं नुसतं लहडलं होतं. त्या आंव्यावर सोजूचा फार जीव. त्या आंव्याशिवाय सोजूला दुसरं आंव्याचं झाड नव्हतं. आणि जे होतं ते आता जावयाला आंदण म्हणून द्यावं लागणार, म्हणून तो गोंधळला. त्याला काही समजेना. तो गप वसला. रुपीच मग पुढं झाली आणि तिनं नवरदेवाला झाड आंदण म्हणून दिल्याचं सांगितलं.

त्यावर नवरदेवानं आपल्या मुंडवळ्या सारल्या आणि कटचार उडवीत तो नवरीला घेऊन मोठ्या दिमाखात गेला. ... सारा प्रसंग सोजूच्या डोळ्यांसमोरून जशील तसा तरळून गेला.

सोजूनं राहीचं लग्न काढलं होतं पण घरी तर दुवळवाडी. मग तिच्या लग्नासाठी पैका? त्याला चांगली दोन तीन वावरं होती. पण देवनदीकाठच्या त्या मळईच्या वावरासारखी कोणत्याच वावराची किंमत येणार नव्हती. म्हणून सोजूनं ते विकावयास काढलं. रांगडचाचा हैवती त्या वावरावर डोळा ठेवूनच होता. तो लगेच पुढं झाला. आणखी दोघे तिघेही पुढं आले. पण हैवतीनं इकदम साडेनवशे रुपये सोजूच्या हातात ठेवले. तेवढी रक्कम देण्याची कुणाचीच ताकद नव्हती. अर्थात मग सोजूनं ते मळईचं वावर हैवतीला देऊन टाकलं. संगमनेरला जाऊन त्यानं तसा कागदही लिहून दिला. पण त्या आधी सोजूनं हैवतीला अट घातली होती,

'हैवती, ह्य मळईचं वावर तुला इकाय मी नाह्य म्हणत नाह्य. पर वावराच्या मधभागी असलेलं शेंदऱ्या आंव्याचं झाड मातर माहं राह्यल, ह्य कवूल व्हंत आसन त तुला वावर मिळल. हाय कवूल?'

थोडचासाठी चांगलं वावर दवडणं हैबतीला मानवण्यासारखं नव्हतं. त्यामुळे त्यानं ते म्हणणं मान्य केलं. सोजू आनंदला. वावर विकल्यावरही त्यातील आंव्याचं झाड आपलं राहणार. म्हणून त्यानं हैवतीला ते वावर दिलं. हैबतीवर त्यानं विस्वास ठेवला. पण हैबती पक्का कावेबाज माणूस! बोलून चालून तो रांगडा. नव्या वावरातील आंवा पाहून तो हातचा कसा दवडणार?

राहीचं लगीन झाल्यावर दहा बारा दिवसानी तो सोजूला वोलला,

'सोज्या, मह्या नया वावरातील शेंदऱ्या आंबा त्वा जावयाला लग्नात अंदाण काम्हून धिलास?'

'का मह्य? झाड माहं पह्यल्यागत

[पान ४७ वर पहा]








# ही नावेच पहा आणि ....

पु. भा. भावे
अरविंद गोखले
ग. त्र्यं. माडखोलकर
कुसुमाग्रज
जयवन्त दळवी
अच्युत बर्वे
ज्ञानेश्वर नाडकर्णी
चित्रकार गोडसे
जी. ए. कुळकर्णी
मधु मंगेश कर्णिक
रणजित देसाई
प्रा. मं. वि. राजाध्यक्ष
वा. रा. कान्त
सोपानदेव चौधरी
राजा बढे
मंगेश पाडगांवकर
शांता शेळके
आनंद साधले
राजाराम हुमणे
प्रा. विजया राजाध्यक्ष
सरोजिनी बाबर
ह. शि. खरात
वसंत देशमुख
बाळ गांगल
सुरेश वेंगुर्लेकर
आणि




गेल्या २४ वर्षांची आपली थोर परंपरा अधिक उज्ज्वल करील असा

● रसिकाना विस्मयचकित करणारे इंद्रधनुष्यी मुखपृष्ठ
● आठ विविध रंगांचा मुक्तखेळ खेळलेल्या चित्रकलाकृति – दीपावलीचे अनेक वर्षांचे एकमेव वैशिष्ट्य
● श्रेष्ठ साहित्यिकांच्या आगळ्या कथा, गझल, एकांकिका आणि विनोदी साहित्याची लयलूट!
● तुम्हाला गुदगुल्या आणि चिमटे एकदमच घेणाऱ्या १६ पानांच्या दुरंगी व्यंगचित्रमालिका!

हे सर्व आहेच, तरीही या वर्षीचे प्रमुख आकर्षण

मूल्य ४ रु. + र. पो. १ रु.

पृष्ठे २२५ वर

वर्ष २४ वे

## कादंबरी स्पर्धेतील पहिल्या पारितोषिकाची कादंबरी



शिवाय दिवाळीत मजा आणणारे विनोदी आपटबार, वात्रटिकांच्या तुडतुड्या, व्यंगचित्रांच्या फुलबाज्या, न-कवित्वाचे अनार इत्यादि साहित्य
एजंटांनी मागणी २५ सप्टेंबरच्या आत नोंदवावी
दलाल आर्ट स्टुडिओ, १०-१२ केनेडी ब्रिज, मुंबई–४

इतर ताज्या दमाचे लेखक तसेच गझल स्पर्धेतील यशस्वी मानकरी

# ....दिवाळी अंकाची कल्पना करा



# अस्मादिक आणि आत्महत्या



**सामान्यांची** मनोराज्ये, इच्छा-आकांक्षा सामान्यच असणार. भिक्षेकरी दिवास्वप्नं काय रंगविणार? आज आपल्याला कुणा उदार महात्म्यानं प्रसन्न होऊन एकदम एकाची नोट दान करावी. पळी पंचपात्र घेऊन फिरणारा भटजी कुणीतरी मिष्टान्नाचं निमंत्रण देऊन चांगलं गळ्यापर्यंत भोजन करावं अगर एखादा ११०-४-१५०-इ. बी. ५-१८० (रिव्हाईज्ड स्केल) चा कारकून एकशे-ऐंशीच्या मनमाड जंक्शनवर अडकून सार्यांडिगला पडतो. मग मनात म्हणतो की झाडून सारे हेडक्लार्क कसल्या तरी कारणाने त्वरित रिटायर व्हावेत अन् माझ्या बढतीचा सिग्नल मिळावा. हे किंवा असेच मनोरथ सामान्य जन करतात.

पण हे जग भारी निष्ठूर. असे सामान्य मनोरथदेखील पूर्ण होत नाहीत येथे. त्याना चडफडत, हात चोळीत बसावं लागतं.

आता माझंच बघाना. आत्महत्या करण्याची माझी इच्छा अगदी वालपणीची. तशी संधी कितीदा तरी आली. पण नाही. कुठल्या तरी कारणाने ती पुरी करण्याचा योग रहितच करावा लागला आहे. जग जसं माणसाला घोड्यावर बसू देत नाही अन् पायीही चालू देत नाही, तसंच हवं तेव्हा मरू देखील देत नाही. आत्महत्येचा :भ्याड विचार माझ्या मनात कां निर्माण व्हावा अशी शंका येईल तुम्हाला पण त्याचं कारण असं आहे मंडळी, विरोधातून आकर्षण निर्माण असतं हे खरं ना? अमुक गोष्ट करू नकोस असं एकसारखं कुणी घोकत राहिलं की माणसाची जिज्ञासा जागृत होऊन तो ती गोष्ट हटकून करतो.

आमच्या मराठी शाळेतील मारकुटचा गायकवाड मास्तरांनी वर्गाच्या भिंतीवर नाना तऱ्हेची वचने, सुभाषिते लिहून त्या खराब करून टाकल्या होत्या. मास्तर ती वचने, आमच्या तोंडाला फेस येई-पर्यंत, घोकूनही घेत असत. "सदा सत्य वदावे" हे त्यातलेच एक रत्न. सदा-काळे हे वचन अस्मादिकांच्या कानांच्या कढईत छडीच्या पळीने ओतत. पण खोटे कां बोलू नये याचे मात्र कधीच स्पष्टीकरण करीत नसत. माझ्या मनात ते वरेच दिवस डाचत होते. म्हणून मी एकदा त्याना विचारलेच,

"पण मास्तर खोटं कां बोलू नये ?"

"खोटं बोलण्यानं पाप लागतं" मास्तर.

"पण पाप म्हणजे काय ?" माझी चौकस बुद्धी गप्प बसत नाही.

मास्तर गप्प बसले. मग काहीतरी लक्षात आल्यासारखा चेहरा करून ते म्हणाले, "तुझी प्रकृती ठीक दिसत नाही. काय दुखतं की काय ?"

माझ्या प्रश्नाला उत्तर न देण्याचा मास्तरांचा कावा मी ओळखला. पण बच्चंजी मी सोडतोय होय तसा ?

"सांगा ना मास्तर खोटं कां बोलू नये ? खरंच कां बोलावं ?"

माझ्या पाठीवर चापट बसवून ते रागाने उद्गारले,

"मी सांगतो म्हणून ! समजले ?"

मास्तरांच्या छडीचं छानपैकी प्रतीक माझ्या हातावर पडू नये म्हणून मी "स स समजलं" असं काहीसं म्हणून सुटका करून घेतली. पण खोटं बोलण्याचं आकर्षण काही कमी होईना.

दुसरे दिवशी मला शाळेत यावयास उशीर झाला. पाच मिनिटांच्या उशीरास एका छडीचा प्रसाद, असा मास्तरांचा नियम व प्रत्येक छडीचा चक्रवाढ व्याजाप्रमाणे वाढता जोर या गणिताचा तोंडी हिशोब माझा तोंडपाठ असल्यामुळे मी त्या दिवशी डोळ्यात पाणी आणून सांगितलं, "मास्तर, माझी आई आजारी होती. त्यामुळे मला घरातील काम करावं लागलं म्हणून उशीर झाला."

काय आश्चर्य ! मास्तराना पटलं की माझं कारण. म्हणजे पहा आता. खरं जर सांगितलं असतं की मला झोपेतून उठायला उशीर झाला होता तर तीन छड्या अन् "लवकर निजे व लवकर उठे तया ज्ञान, आरोग्य, संपत्ती भेटे" हे वचन माझ्याकडून हमखास पंचवीस वेळा लिहवून घेतलं असतं मास्तरानी ! खोटं बोलण्याचा झाला की नाही फायदा ?

तसेच "हात फिरे तेथे लक्ष्मी फिरे" हे वचन. अहो अस्मादिकांची मातोश्री घरात नेहमीच स्वच्छता ठेवी. गाईच्या शेणाने

> 'आत्महत्या करायला जातो' असं सौ. ला सांगून निघालो, जिन्याच्या पायऱ्या उतरू लागलो तोच सौ. ची हाक आली...... मी परतलो तेव्हा ती म्हणाली, 'जाताना तेवढा दरवाजा बंद करा...... प्लीज......'

जमीन हिरवीगार सारवी. दिवाळीला साफसफाई होई. पण मास्तरांच्या या सुविचारातील "लक्ष्मीबाई"नं कधीही फेरी टाकून आमच्या घरात एखादं "स्मृतिचित्र" ठेवलं नाही ! आणि अस्मादिकांच्या बाबतीत तर काय ? अगदी ठणठणाट असायचा. वर्गात आमचं अन् सरस्वतीचं कधी पटलं नाही. अगदी छत्तीसाचा आकडा असायचा. त्यामुळे मास्तरांचा हात आमच्या पाठीवरून, गालावरून नेहमीच फिरवायाचा. पण एवढं सहन करूनही मला कधी लक्ष्मी भेटली नाही. बहुतेक लक्ष्मीचे सर्व कार्यक्रम सदैव 'एंगेज' झाले असल्यामुळे आमच्याकडे 'व्हिजिट' द्यायला तिला

## चंद्रकांत र. महामिने

फुरसतच नसावी! तेव्हा माझ्या बाबतीत वरील वचन "हात फिरे तेथे मास्तरांची पाचही बोटे उठे" या न्यायाने सिद्ध होई.

तेव्हा हा वचनांचा प्रपंच करायचा उद्देश एवढाच की, अमुक करू नका म्हटलं की नेमकं तेच करण्यास माणसाला तीव्र इच्छा होते. अस्मादिकांच्या आत्महत्या प्रेमाचं मूळ यातच आहे.

स्त्रीचा सांभाळ बालपणी पिता, तारुण्यात पती व वार्धक्यात पुत्र करतो असं मनुस्मृतीत म्हटलंय. म्हटलं असेल बुवा ! तेव्हा हमखास पुरुषप्रधान समाजव्यवस्था असावी; पण आज ? आज स्त्रियांचं जग आहे. व्याख्या किंवा वचने कालानुरूप बदलतात हे खरे. मनुच्या काळात हे वचन खरे असेल पण आजच्या जमान्यात पुरुषाचा सांभाळ, बालपणी आई, तारुण्यात पत्नी अन् वार्धक्यात पेन्शन किंवा बँक (दोन्ही स्त्रीलिंगीच आहेत ! ) करते. हे नवे वचन रूढ व्हावयास प्रत्यवाय नसावा !

प्रस्तुत नववचनानुसार अस्मादिकांची शेंडी बालपणी प. पू. मातोश्रींच्या हाती होती. अस्मादिक आणि धडपड बरोबरच जन्मलो. या धडपडीने आईला जीव नकोसा व्हायचा. दिवसभरात काही पराक्रम (आईच्या शब्दात उपद्व्याप) केला नाही असे कधी व्हायचे नाही. पावनखिंडीत शत्रूच्या वारानी जितक्या जखमा बाजी प्रभूस झाल्या असतील तितक्याच जखमा अस्मादिकास बालपणीच उंचावरून पडून, ठेचा लागून, मारामारी करून झाल्या होत्या ! वयाच्या आठव्या वर्षापर्यंत अंगावर नेहमीच एखादी तरी जखम ताजी असायचीच. फरक मात्र एवढाच होता की बाजी प्रभूने एकवीस तोफांचे आवाज ऐकल्याबरोबर शिवाजी महाराज गडावर सुखरूप पोहोचले या समाधानाने प्राण सोडले होते; पण आम्ही मात्र आईचा तोफेसारखा आवाज एकदाच ऐकल्याबरोबर मारामारीचा आनंद गमावून बसायचो अन् आमचे प्राण कंठाशी यायचे !

अशा प्रकारचे रत्न बिचाऱ्या माऊलीच्या उदरी आल्यामुळे "कार्टं मरायचं एखाद वेळी" हे तिच्या तोंडी परवलीचे शब्द झाले होते !

या परवलीच्या शब्दांबरोबरच अस्मादिकांची पाठ पिठासारखी मळली जाई. दोन्ही गालांचा मृदंग केला जाई अन् वीणेच्या खुंट्या पिरगळाव्यात तसे कान पिरगळून ओढले जात. अर्थात तिच्या या मेहनतीचा हमखास उपयोग होई. पाठ मळल्यामुळे पाठीचे धिरडे होत असे; गालाचा मृदंग केल्याने तिला हवा तो आवाज आमच्या मुखावाटे बाहेर पडे अन् वर्गात मास्तर जेव्हा जेव्हा मला 'लंबकर्ण' म्हणून माझा गौरव (!) करीत तेव्हा आईने आपले कान ओढल्यामुळेच मास्तरानी हा किताब आपणास बहाल केला असे मला वाटे !

अर्थात त्यावेळी आईच्या या प्रसादामुळे अन् परवलीच्या वाक्याने आम्हास खरोखरच मरण बरे वाटू लागले होते !

एकदा काय झाले, उंच फळीवर ठेवलेला लाडवाचा डबा शिकस्तीने खाली काढण्याच्या एकाकी प्रयत्नात गढून गेलो होतो. घोरपडीच्या शेपटीला दोर बांधून कोंडाण्यावर चढणाऱ्या तानाजीचा आवेश अंगात होता. डब्याच्या तुरुंगात अडकून पडलेल्या लाडवांची सुटका करण्याची तीव्र इच्छा अस्मादिकांच्या जिभेला झाली होती. आणि ही इच्छा जीभ ओलेती होऊन व्यक्त करीत होती ! किल्ला जवळ जवळ हस्तगत झाला होता. फक्त मुद्देमालास हात घालावयाचा होता. आणि एवढ्यात मासाहेबांची, मी रचलेल्या 'डब्यातून सुटका' अर्थात "लाडवांची चोरी" या नाटकात, अकल्पितपणे एंट्री झाली ! या पात्राची पाळी नसताही झालेल्या अचानक एंट्रीमुळे मी अक्षरशः गडबडलो, घडपडलो अन् संवाद न आठवणाऱ्या नटाप्रमाणे त त प प करीत फळीवरील सर्व डब्याना बरोबर घेऊन पडलो !

लाडवांची सुटका झाली पण ते खोलीभर इतस्ततः पसरले. पण प्रथम स्वसंरक्षण करणे अगत्याचे असल्यामुळे मी शत्रू दृष्टीच्या टप्प्यात आल्याबरोबर गनिमी काव्याने लढणाऱ्या मावळ मराठा सैनिकाप्रमाणे पलायनाचा मार्ग स्वीकारला. घराच्या धाब्यावर गुपचूप जाऊन बसलो. आईची तोफ–डागणी चालूच होती. पण मी हल्ल्याच्या क्षेत्रापलिकडे असल्यामुळे तोफेचा उपयोग होत नव्हता. धुरांडयातून पाहिले. लाडवाना पुनः तुरुंगात टाकले जात असलेले दिसले. परवशतेचा पाश त्याना लागल्याचे पाहून मला फारच वाईट वाटले व (जिभेला सुटलेल्या पाण्याचा) आवंढा गिळला. पण चोरून लाडू खाणे हा आपला जन्मसिद्ध हक्क असल्यामुळे त्यांची पुनः योग्य संधी येताच सुटका करण्याचे जिभेस आश्वासन दिले आणि बसून राहिलो, गुपचूप, अंधार पडेपर्यंत !

बराच अंधार पडल्यावर मात्र आई घाबरली. "कुठं गेलं कार्टं ऽऽ? जीवबीव द्यायचं एखाद वेळी" तेच परवलीचं वाक्य आईकडून उच्चारलं गेलं. पण आवाजाचा आकार वेगळा होता; घाबरलेला, काळजीने भारलेला.

"अरे बघा त्याला कुठंतरी. रात्र झालीय. मरायचं बाई पोरगं या अशा उपद्व्यापानं" डोळ्यांना पदर लावीत आई थोरल्या भावास मला शोधण्यास सांगत होती.

मग मीही जास्त ताणलं नाही. आईचं रडणं ऐकून माझ्याही पोटात कसंतरी झालं. तिच्या डोळ्यातील पाणी निष्कारण वाया जाऊ नये या उद्देशाने मी खाली उतरलो व तिच्यासमोर जाऊन उभा राहिलो, मार खाण्याच्या तयारीनं. जास्त जोरात रपाटा बसू नये म्हणन पाठीला पोक काढले. गाल व कान दोन्ही हातानी झाकण्याचा प्रयत्न केला. अन् रडताना आवाजाची कितवी पट्टी लावावी याचा अंदाज घेऊ लागलो.

पण झालं भलतंच ! आईनं एकदम प्रेमानं मला जवळ ओढलं. डोक्यावरून, पाठीवरून प्रेमानं हात फिरविला (अगदी शाब्दिक अर्थाने !) अन् उद्गारली, "भ्यालं असेल ग अंधारात माझं लेकरु."

मार खाण्याची माझी सारी पूर्वतयारी वाया गेली. माराऐवजी लाडू खावयास मिळाले !

रात्री अंथरूणावर पडल्यावर मात्र मला एकदम काहीतरी नवीन शस्त्र सापडल्याचा आनंद झाला. "जीव द्यायच्या" प्रकरणाला आई घाबरत होती म्हणायची ! अन् हे शस्त्र स्पर्शिल्यावरोबर आपणास हवी ती वस्तु मिळत होती तर !

या युक्तीचा मी नंतर बराच उपयोग केला ! पण नंतर वापरून वापरून ते बोथट झाले की काय कुणास ठाऊक. कारण अस्मादिकांचं जस जसं वय वाढू लागलं तस तसं आईचं आमच्यावरचं लक्ष कमी झालं. एकदा जेव्हा आईनं "काही मरत नाही. पुष्कळ मोठा घोडा झालाय" असे उद्गार काढले तेव्हा हे शस्त्र निरुपयोगी झाल्याचं स्पष्ट दिसलं !

बाळपणाच्या लंबकर्णत्वाचा त्याग करून अस्मादिकानी तारुण्याच्या आणि कॉलेजच्या पायऱ्यावर एकेक असे दोन्ही पाय ठेवले. या दोन्ही डगरीवर उभं राहून चालण्याच्या वृथा प्रयत्नात आम्हास प्रेमभंगाच्या व नापासाच्या ठेचा बसू लागल्या! अगदी नेमानं की हो ! अर्थात परीक्षेच्या निकालाचं आपल्याला फारसं कधीच वैषम्य वाटलं नाही बुवा. कारण नापासाचे वार आम्ही बिगार यत्तेपासून झेलत आलो होतो. या परीक्षेच्या निकालाबाबत आम्ही तुकाराम महाराजांची सहनशीलता, शिवाजी महाराजांची धडाडी अन् "कर्मण्येवाऽधिकारस्ते मा फलेषु कदाचन" हे भगवत्गीतेचे वचन सोयीस्करपणे अंगी बाणवले होते !

शिवाय तुमच्या कानात खरं सांगायचं म्हणजे आपल्याला तर बुवा पदवीच्या शेपटापेक्षा पोरींच्या केसांचे शेपटेच अधिक आवडायचे ! प्राध्यापकांच्या बडबडीऐवजी पोरींची कुजबुज श्रवणीय वाटायची. नोटस् घऊन कागद खराब करण्यापेक्षा त्यांचे बाण करून फेकणे म्हणजे कागदाचा सदुपयोग वाटे. वर्गातील मुलांच्या गर्दीपेक्षा कँटीनच्या स्पेशल रूममध्ये एखाद्या छोकरीबरोबर निवांतपणे गप्पा मारण्यात कोण मजा वाटे !

मग याचा परिणाम दुसरा काय होणार ? अस्मादिकाना अभ्यासाकडे लक्ष द्यावयास सवड होत नसे अन् परीक्षकास आम्हाला पुरेसे मार्क देण्यास सवड मिळत नसे ! मग












आम्ही परीक्षेत अन् प्रेमात एकदमच पडायचे.

मी जरी नापासाचे फारसे मनावर घेत नसे तरी आमची प्रेयसी मात्र या प्रकारांची गंभीरपणे दखल घेई. तिला फार म्हणजे फारच वाईट वाटे अन् "असल्या नापास वीरावर उगीच ग बाई प्रेम केलं" असं म्हणून आमचं हृदय परत करून निघून जाई !

असा प्रेमभंग झाला की मला आत्महत्त्येचा झटका येई ! कुठली तरी एक गोष्ट हाताशी असावी हे तर आपले ध्येय. पोरगी किंवा मरण ! पोरीशिवाय जीवन मिथ्या आहे व प्रेमभंग होऊन मरण्यात उदात्तता आहे असं मुळी आपलं तत्त्वज्ञानच होतं ! मग प्रेमभंग झाला की अस्मादिक आत्महत्त्या करण्यास निघायचे. मृत्यूचं स्वागत हसतमुखाने करण्यासाठी सिद्ध व्हायचे. मरणाच्या यातना कशा असतील या विचारात गुंग व्हायचे. सर्व सिद्धता व्हायची. आता मृत्यूला कवटाळणार तोच कॉलेजमध्ये पहिल्या वर्षीच पाऊल टाकलेल्या पोरीची मूर्ती समोर येऊन विनवणी करायची, "नको, नको. हे थोर प्रेमवीरा आत्महत्त्येचा आततायी मार्ग तू स्वीकारू नकोस. मी तुझ्यावर प्रेम करावयास सिद्ध आहे !"

आता त्या नवीन पोरीच्या मूर्तीनं मन:चक्षूसमोर इतकी विनवणी केल्यावर आत्महत्त्या हो कशी करायची ? कुणाचा हिरमोड करायला मला नाही बुवा आवडत. माझ्या मृत्यूने तिच्या हृदयाला (दुसऱ्याच कुणा प्रेमवीराकडून) धक्का बसू नये म्हणून केवळ नाईलाज म्हणून मी आत्महत्येचा बेत रहीत करी व तिच्या प्रेमात पडे ! हे दुष्टचक्र किती वर्षे चालले पण या पोरींनी मात्र धड आमच्यावर शेवटपर्यंत प्रेमही केलं नाही अन् आत्महत्याही करू दिली नाही !

पण कॉलेजात जेव्हा मीना गोखलेचा प्रवेश झाला तेव्हा आपण पूर्वीच्या प्रेमभंगानी आत्महत्या केली नाही हे फारच उत्तम झालं असं वाटू लागलं. कारण मीना गोखले पोरगी होतीच तशी. तशी म्हणजे काय महाराजा.....कसलीही उपमा तिच्या सौंदर्याला पुरी पडली नसती. स्वर्गातील सौंदर्य साकार झालं होतं. ब्रम्हदेवाने खास 'ओव्हर टाईम' घेऊन ही शिल्पाकृती घडविली होती ! कॉलेजातील कुठली तरी पदवी घेऊन बॅचलर होण्यापेक्षा मीना गोखलेबरोबर चतुर्भुज होऊन ब्रम्हचर्याला कायमचा रामराम ठोकावयास आपण तर बुवा फार उत्सुक होतो !

आता तुम्हीच सांगा, अशा सौंदर्यसंपन्न मीनेवर आम्ही प्रेम नाही करायचं तर मग तिनं प्रेम तरी कुणावर करावं ? ही गोखले कुलोत्पन्न मीना केवळ अस्मादिकांसाठीच निर्माण झाली आहे अशी आम्ही ठाम समजूत करून घेतली. आमचं शरीर, आत्मा, मन वगैरे वगैरे सर्व मीनामय झालं. आणि तिचं प्रेम साध्य करून घेणं हेच कर्तव्य ठरलं.

यथासांग कर्तव्य केलं अन् प्रयत्नास फळ आलं. मी अन् मीना. मीना अन् मी. बस्स्, जोडी जमली. दोघांच्या पदव्या पदरात पडल्या की (तिच्या पातळाच्या अन् माझ्या मनिलाच्या पदरात !) लगेच परस्परांवर अक्षता टाकवून घ्यायच्या हे आणाभाका घेऊन निश्चित झालं. पण 'हा







अर्थात त्यावेळी आईच्या या प्रसादामुळे अन् परवलीच्या वाक्याने आम्हास खरोखरच मरण बरे वाटू लागले होते !

एकदा काय झाले, उंच फळीवर ठेवलेला लाडवाचा डबा शिकस्तीने खाली काढण्याच्या एकाकी प्रयत्नात गढून गेलो होतो. घोरपडीच्या शेपटीला दोर बांधून कोंडाण्यावर चढणाऱ्या तानाजीचा आवेश अंगात होता. डब्याच्या तुरुंगात अडकून पडलेल्या लाडवांची सुटका करण्याची तीव्र इच्छा अस्मादिकांच्या जिभेला झाली होती. आणि ही इच्छा जीभ ओलेती होऊन व्यक्त करीत होती ! किल्ला जवळ जवळ हस्तगत झाला होता. फक्त मुद्देमालास हात घालावयाचा होता. आणि एवढ्यात मासाहेबांची, मी रचलेल्या 'डब्यातून सुटका' अर्थात "लाडवांची चोरी" या नाटकात, अकल्पितपणे एंट्री झाली ! या पात्राची पाळी नसताही झालेल्या अचानक एंट्रीमुळे मी अक्षरशः गडबडलो, धडपडलो अन् संवाद न आठवणाऱ्या नटाप्रमाणे त त प प करीत फळीवरील सर्व डब्याना बरोबर घेऊन पडलो !

लाडवांची सुटका झाली पण ते खोलीभर इतस्ततः पसरले. पण प्रथम स्वसंरक्षण करणे अगत्याचे असल्यामुळे मी शत्रू दृष्टीच्या टप्प्यात आल्याबरोबर गनिमी काव्याने लढणाऱ्या मावळ मराठा सैनिकाप्रमाणे पलायनाचा मार्ग स्वीकारला. घराच्या धाब्यावर गुपचूप जाऊन बसलो. आईची तोफ–डागणी चालूच होती. पण मी हल्ल्याच्या क्षेत्रापलिकडे असल्यामुळे तोफेचा उपयोग होत नव्हता. धुरांडयातून पाहिले. लाडवाना पुनः तुरुंगात टाकले जात असलेले दिसले. परवशतेचा पाश त्याना लागल्याचे पाहून मला फारच वाईट वाटले व (जिभेला सुटलेल्या पाण्याचा) आवंढा गिळला. पण चोरून लाडू खाणे हा आपला जन्मसिद्ध हक्क असल्यामुळे त्यांची पुनः योग्य संधी येताच सुटका करण्याचे जिभेस आश्वासन दिले आणि बसून राहिलो, गुपचूप, अंधार पडेपर्यंत !

वराच अंधार पडल्यावर मात्र आई घाबरली. "कुठं गेलं कार्टं ऽऽ? जीवबीव द्यायचं एखाद वेळी" तेच परवलीचं वाक्य आईकडून उच्चारलं गेलं. पण आवाजाचा आकार वेगळा होता; घाबरलेला, काळजीने भारलेला.

"अरे बघा त्याला कुठंतरी. रात्र झालीय. मरायचं बाई पोरगं या अशा उपद्व्यापानं" डोळ्यांना पदर लावीत आई थोरल्या भावास मला शोधण्यास सांगत होती.

मग मीही जास्त ताणलं नाही. आईचं रडणं ऐकून माझ्याही पोटात कसंतरी झालं. तिच्या डोळ्यातील पाणी निष्कारण वाया जाऊ नये या उद्देशाने मी खाली उतरलो व तिच्यासमोर जाऊन उभा राहिलो, मार खाण्याच्या तयारीनं. जास्त जोरात रपाटा बसू नये म्हणन पाठीला पोक काढले. गाल व कान दोन्ही हातानी झाकण्याचा प्रयत्न केला. अन् रडताना आवाजाची कितवी पट्टी लावावी याचा अंदाज घेऊ लागलो.

पण झालं भलतंच ! आईनं एकदम प्रमानं मला जवळ ओढलं. डोक्यावरून, पाठीवरून प्रेमानं हात फिरविला (अगदी शाब्दिक अर्थाने !) अन् उद्गारली, "म्यालं असेल ग अंधारात माझं लेकरु."

मार खाण्याची माझी सारी पूर्वतयारी वाया गेली. माराऐवजी लाडू खावयास मिळाले !

रात्री अंथरूणावर पडल्यावर मात्र मला एकदम काहीतरी नवीन शस्त्र सापडल्याचा आनंद झाला. "जीव द्यायच्या" प्रकरणाला आई घाबरत होती म्हणायची ! अन् हे शस्त्र स्पर्शिल्याबरोबर आपणास हवी ती वस्तु मिळत होती तर !

या युक्तीचा मी नंतर बराच उपयोग केला ! पण नंतर वापरून वापरून ते बोथट झाले की काय कुणास ठाऊक. कारण अस्मादिकांचं जस जसं वय वाढू लागलं तस तसं आईचं आमच्यावरचं लक्ष कमी झालं. एकदा जेव्हा आईनं "काही मरत नाही. पुष्कळ मोठा घोडा झालाय" असे उद्गार काढले तेव्हा हे शस्त्र निरुपयोगी झाल्याचं स्पष्ट दिसलं !

बाळपणाच्या लंबकर्णत्वाचा त्याग करून अस्मादिकानी तारुण्याच्या आणि कॉलेजच्या पायऱ्यावर एकेक असे दोन्ही पाय ठेवले. या दोन्ही डगरीवर उभं राहून चालण्याच्या वृथा प्रयत्नात आम्हास प्रेमभंगाच्या व नापासाच्या ठेचा बसू लागल्या! अगदी नेमानं की हो ! अर्थात परीक्षेच्या निकालाचं आपल्याला फारसं कधीच वैषम्य वाटलं नाही बुवा. कारण नापासाचे वार आम्ही विगार यत्तेपासून झेलत आलो होतो. या परीक्षेच्या निकालाबाबत आम्ही तुकाराम महाराजांची सहनशीलता, शिवाजी महाराजांची धडाडी अन् "कर्मण्ये वाऽधिकारस्ते मा फलेषु कदाचन" हे भगवत्गीतेचे वचन सोयीस्करपणे अंगी बाणवले होते !

शिवाय तुमच्या कानात खरं सांगायचं म्हणजे आपल्याला तर बुवा पदवीच्या शेपटापेक्षा पोरींच्या केसांचे शेपटेच अधिक आवडायचे ! प्राध्यापकांच्या बडबडीऐवजी पोरींची कुजबुज श्रवणीय वाटायची. नोटस् घऊन कागद खराब करण्यापेक्षा त्यांचे बाण करून फेकणे म्हणजे कागदाचा सदुपयोग वाटे. वर्गातील मुलांच्या गर्दीपेक्षा कँटीनच्या स्पेशल रूममध्ये एखाद्या छोकरीबरोबर निवांतपणे गप्पा मारण्यात कोण मजा वाटे !

मग याचा परिणाम दुसरा काय होणार ? अस्मादिकाना अभ्यासाकडे लक्ष द्यावयास सवड होत नसे अन् परीक्षकास आम्हाला पुरेसे मार्क देण्यास सवड मिळत नसे ! मग








आम्ही परीक्षेत अन् प्रेमात एकदमच पडायचे.

मी जरी नापासाचे फारसे मनावर घेत नसे तरी आमची प्रेयसी मात्र या प्रकारांची गंभीरपणे दखल घेई. तिला फार म्हणजे फारच वाईट वाटे अन् "असल्या नापास वीरावर उगीच ग बाई प्रेम केलं" असं म्हणून आमचं हृदय परत करून निघून जाई !

असा प्रेमभंग झाला की मला आत्महत्त्येचा झटका येई ! कुठली तरी एक गोष्ट हाताशी असावी हे तर आपले ध्येय. पोरगी किंवा मरण ! पोरीशिवाय जीवन मिथ्या आहे व प्रेमभंग होऊन मरण्यात उदात्तता आहे असं मुळी आपलं तत्त्वज्ञानच होतं ! मग प्रेमभंग झाला की अस्मादिक आत्महत्त्या करण्यास निघायचे. मृत्यूचं स्वागत हसतमुखाने करण्यासाठी सिद्ध व्हायचे. मरणाच्या यातना कशा असतील या विचारात गुंग व्हायचे. सर्व सिद्धता व्हायची. आता मृत्यूला कवटाळणार तोच कॉलेजमध्ये पहिल्या वर्षीच पाऊल टाकलेल्या पोरीची मूर्ती समोर येऊन विनवणी करायची, "नको, नको. हे थोर प्रेमवीरा आत्महत्त्येचा आततायी मार्ग तू स्वीकारू नकोस. मी तुझ्यावर प्रेम करावयास सिद्ध आहे !"

आता त्या नवीन पोरीच्या मूर्तीनं मनःचक्षूसमोर इतकी विनवणी केल्यावर आत्महत्त्या हो कशी करायची ? कुणाचा हिरमोड करायला मला नाही बुवा आवडत. माझ्या मृत्यूने तिच्या हृदयाला (दुसऱ्याच कुणा प्रेमवीराकडून) धक्का बसू नये म्हणून केवळ नाईलाज म्हणून मी आत्महत्येचा बेत रहीत करी व तिच्या प्रेमात पडे ! हे दुष्टचक्र किती वर्षे चालले पण या पोरींनी मात्र धड आमच्यावर शेवटपर्यंत प्रेमही केलं नाही अन् आत्महत्याही करू दिली नाही !

पण कॉलेजात जेव्हा मीना गोखलेचा प्रवेश झाला तेव्हा आपण पूर्वीच्या प्रेमभंगानी आत्महत्या केली नाही हे फारच उत्तम झालं असं वाटू लागलं. कारण मीना गोखले पोरगी होतीच तशी. तशी म्हणजे काय महाराजा.....कसलीही उपमा तिच्या सौंदर्याला पुरी पडली नसती. स्वर्गातील सौंदर्य साकार झालं होतं. ब्रम्हदेवाने खास 'ओव्हर टाईम' घेऊन ही शिल्पाकृती घडविली होती ! कॉलेजातील कुठली तरी पदवी घेऊन बॅचलर होण्यापेक्षा मीना गोखलेबरोबर चतुर्भुज होऊन ब्रम्हचर्याला कायमचा रामराम ठोकावयास आपण तर बुवा फार उत्सुक होतो !

आता तुम्हीच सांगा, अशा सौंदर्यसंपन्न मीनेवर आम्ही प्रेम नाही करायचं तर मग तिनं प्रेम तरी कुणावर करावं ? ही गोखले कुलोत्पन्न मीना केवळ अस्मादिकांसाठीच निर्माण झाली आहे अशी आम्ही ठाम समजूत करून घेतली. आमचं शरीर, आत्मा, मन वगैरे वगैरे सर्व मीनामय झालं. आणि तिचं प्रेम साध्य करून घेणं हेच कर्तव्य ठरलं.

यथासांग कर्तव्य केलं अन् प्रयत्नास फळ आलं. मी अन् मीना. मीना अन् मी. बस्स्, जोडी जमली. दोघांच्या पदव्या पदरात पडल्या की (तिच्या पातळाच्या अन् माझ्या मनिलाच्या पदरात !) लगेच परस्परांवर अक्षता टाकवून घ्यायच्या हे आणाभाका घेऊन निश्चित झालं. पण 'हा

हन्त हन्त नलिनीम्......" दिवाळीच्या सुटीत कु. मीना गोखले भलत्याच कुणाची तरी सौभाग्यवती झाली की हो !

पुन्हा . . . . पुन्हा इतिहासाची आवृत्ती झाली . . . . . प्रे...म....भं...ग झाला होता. आता जीवनाचा शेवट करण्याशिवाय दुसरा मार्गच नव्हता. एवढं रामायण झाल्यावर आत्महत्त्या नाही करायची तर मग दुसरं काय भव्य करायचं ? रामायणात रामानंही शरयू नदीत जीव दिला होता मग मी काय कुणाचं घोडं मारलं होतं ? अस्मदिकांच्याही आयुष्यात रामायण घडलं होतं. सीतेसारख्या मीनेला पळवून कुणा रावणानं तिला माझ्यापासून हिरावलं होतं. आता या ष्टोरीचा क्लायमॅक्स आत्महत्याच होय !

सर्व तयारी केली. रात्री दोनच्या सुमारास घराबाहेर पडलो. अंगात शर्टशिवाय दुसरं काही नव्हतं. काय करायचं होतं कोट वा स्वेटर घालून ? मरायचंच तर होतं मला. फिरत फिरत शहराबाहेर आलो. थोड्या वेळाने कलकत्ता मेल जाणार होती. ती येण्यापूर्वी रुळावर झोपून राहिलो की बस्स. . .गाडीचा खडखडाट... हळूहळू जवळ येतेय . . रुळावर मान ठेवलेली.... येतेय....गाडी येतेय... रूळ हलताहेत.... आली...रुळावरची मान...खट्ट....अन् खेळ खलास ! माझ्या श्वासांची कलकत्ता मेल तुफान वेगाने चालू झाली, केवळ कल्पनेने.... छे फार निर्घृण हत्त्या होती ही. मीना गोखलेने माझे छिन्नविच्छिन्न प्रेत पाहिले तर मूर्च्छित पडेल विचारी ती. तिला धक्का बसेल. छे छे तिला दुःख होईल अशा प्रकारची आत्महत्त्या जिवात जीव असेपर्यंत (?) मी करणार नाही. मग काय करावं ? दुसरा एखादा प्रकार नाही का ? मला विहीर बरी वाटली. मला पोहता येत नव्हतेच. उडी मारली की संपलं.

रेल्वे स्टेशनचा रस्ता सोडून एका मळ्याची वाट धरली. मळ्यात विहीर होती. तिच्यात उडी टाकली की झाले. चार दोन गटांगळ्या. एकदा पाण्यावाहेर यायचे अन् पुन्हा तळाशी.... खोल....अन् मग प्रेतच फुगून वर येईल. . .सकाळी कुणीतरी बघेल.... आरडाओरड होईल. मीना गोखलेस समजेल....अन् मग तिला पश्चात्ताप होईल माझ्याशी प्रतरणा केल्यावद्दल . . . माझे प्रेम लाथाडल्यावद्दल.

पण मनात पुनः विचार आला. विहिरीतील आत्महत्त्या तरी तिला आवडेल का ? या आत्महत्त्येनं सनसनाटी निर्माण होईल का? मरतानासुद्धा काही तरी डॅश पाहिजे, नाही का ?

मग नक्की कुठे आत्महत्त्या करावी ? रुळावरं की विहिरीत ? थंडीने अंग काकडत होते. अन् रूळ की विहीर हा मूलभूत प्रश्न निर्माण झाला होता. कुठलाही मूलभूत प्रश्न प्रथम सोडवावयास हवा. म्हणजे पुढील कटकटी टळतात, असं कुणीसं म्हटल्याचं नेमकं याच वेळी आठवलं. काय करावं. मोठा प्रश्न पडला, अगदी हॅम्लेटसारखा. शेवटी विचार करता करता उजाडलं अन् हे लक्षात येताच मी आजुबाजूला पाहिलं. . . .मी माझ्या घरासमोर उभा असल्याचं घरच सांगत होतं ! हा प्रश्न मीनेला विचारूनच सोडवू असं ठरवून घरात शिरलो.

नंतर चार पाच दिवस मीना गोखले भेटलीच नाही ! आणि सहाव्या दिवशी फार उशीर झाला होता आत्महत्त्येस ! कारण . . . अ ऽऽऽऽ कारण तोपर्यंत मी नवीन पोरीवर प्रेम करू लागलो होतो अन् या नव्या पोरीसाठी जगणं अवश्य होऊन बसलं होतं ! !

विहिरीच्या पाण्यात जरी नाही तरी आम्ही प्रेमात गटांगळ्या खात राहिलो. महिनेन्‌महिने...व एकदाचे साफ बुडालो. तळापर्यंत गेलो....म्हणजे एकीशी लग्न करून बसलो !

लग्नानंतर पहिली एक दोन वर्षे आम्ही दोघे पृथ्वीवर रहातच नव्हतो; स्वर्गातच वावरत होतो. त्यामुळे आत्महत्त्येचा प्रश्नच निर्माण झाला नाही. परंतु दोन वर्षांनी जेव्हा एका मुलाचे पितृत्व अस्मादिकांकडे आले तेव्हा आपण पृथ्वीवरच इतके दिवस वावरत असल्याचे ध्यानात आले. सौ. चे प्रेम कमी होऊन ती चिरचिरी झाली. अन् मधून मधून आमच्यात खटके उडू लागले.

आणि एकदां असेच कशावरून तरी बिनसले. शब्दाशब्दी झाली. अन् मी निर्वाणीचे शस्त्र बाहेर काढले. "माझ्यावरचं तुझं प्रेम ओसरलंय. आता मी कुणासाठी जगू ? आत्महत्त्याच करतो मी आता." एवढे बोलून मी टेबलाच्या खणातून कागद काढला, पेन ओरबाडले अन् लिहिले, "मी स्वखुशीने आत्मत्याग करीत आहे. त्यात



अनुक्रमणिका

ुणाचाही संबंध नाही." आणि सौ.ने पेन ाझ्या हातातून हिसकावून घेतले. डोळ्यात ाणी आणून माझ्या पाया पडली.

"चुकलं माझं." सौ.

"ते काही असो. माझा निश्चय ठरला ह्णजे ठरला." मी.

"पण चुकलं म्हणते ना. क्षमा करा."

"नो नो. आय ॲम् गोईंग टू कमीट ुइसाइड." माझा अभंग निश्चय मी ंग्रजीतून व्यक्त केला. कारण इंग्रजीतून ांगितल्यावर चटकन् परिणाम होतो ना.

"आजपासून तुम्ही म्हणाल तशी वागेन ी." सौ. पाय सोडावयास तयार नव्हती,

"तुमच्या शब्दाबाहेर जाणार नाही."

"अगदी नक्की ?"

"नक्की."

"माझे सिगारेटचे व्यसन चालू राहील."

"चिरूट ओढला तरी मी काही म्हणणार ाही."

"रविवारी दाढी, आंघोळीचा आग्रह ालणार नाही."

"कबूल."

"ऑफिसातून यायला उशीर झाला तरी ागवायचं नाही."

"कबूल. कबूल. सारं काही कबूल मला. ण तो कागद फाडून टाका अन् तुमचा निश्चय सोडा."

"सोडला" मी कागद फाडीत विजयो-ादानं म्हटलं.

हृदयपरिवर्तन करण्यासाठी आत्महत्या ा केवढा प्रभावी मार्ग होता ! उगीच ाही लोक उठल्यासुटल्या प्राणांतिक उपोषणाच्या धमक्या देत सरकारला ! सौ. ने माझ्या सर्व अटी एकदम कबूल केल्यामुळे त्या दिवशी भलताच खूष झालो ोतो ! आनंदाच्या भरात मी 'आत्म-त्या' या विषयावर तिला गोडीत घेऊन याख्यान सुनाविले. आणि अटी कबूल केल्यामुळे तिने ते व्याख्यान निमूटपणे ऐकूनही घेतले ! व्याख्यानात मी कॉलेजात केलेल्या अनेक आत्महत्या निवेदन केल्या. अगदी मनमोकळेपणे.

आणि इथेच घोडचूक करून बसलो हे नंतर लक्षात आले. माणूस बायकोबरोबर प्रेमात आला की काही तरी गुपित, खरे-पणाने सांगतो आणि तो प्रेमाचा कैफ उतरला की मग आपण गाढवपणा करून बसल्याचं त्याच्या प्रत्ययास येतं.

परवा अगदी असाच प्रकार झाला हो. पाकिस्तानप्रमाणे सर्व कराररमदार धाब्या-वर बसवून तिने घोषणा केली. "उद्या-पासून तुम्हाला सिगारेट सोडावी लागेल !"

"अँऽऽऽ ? काय म्हणतेस ? " माझे आश्चर्य. तो फतवा तिने पुन्हा उच्चारला.

"कां ? कां बरं ? "

"महागाई वाढतेय. निष्कारण पैसे घालवायचे नाहीत मला."

"अस्सं ? मग आपल्या अटींचं काय करायचं ?"

"कसल्या अटी ?"

"त्याच आत्महत्येच्या. तू सारं कबूल केलं होतंस"

"तो करार मोडला म्हणून समजा."

"हा ढळढळीत विश्वासघात आहे !"

"काहीही समजा."

"हा अस्साच जातो आत्महत्त्या करा-यला." मी गरजलो !

"अस्सं ? केव्हा निघता ?" सौ. ने विचारले.

"केव्हा निघता ? म्हणजे तुला माझी जरुरी नाही ? मी मेलो तरी चालेल. निघालो बघ" पायात चपला सरकावीत घराबाहेर निघालो !

दाराबाहेर पडून जिन्याच्या पायऱ्या उतरू लागलो तोच सौ. ने हाक मारली. म्हणजे थोडे फार प्रेम शिल्लक आहे म्हणा-यचं. आता परत फिरल्यावर ती पश्चात्ताप झाल्याचं सांगणार. अटी कबूल करणार ! अन् मी आत्महत्या करू नये म्हणून डोळ्यात अश्रू आणून विनविणार. पुन्हा तोच खेळ ! ती काय म्हणतेय ते तरी ऐकावं म्हणून मी परतलो. दारातूनच तिला विचारलं, "काय आहे ?"

" तुम्ही कुठं निघालात म्हणे ?" सौ.

"कुठे म्हणजे ? आत्महत्त्या करायला."

"ठीक ठीक. जाताना तेवढा दरवाजा बंद करा,प्लीज."सौ. आरामखुर्चीत स्वत:चे अंग खुपशीत म्हणाली ! !

"अँ ?" मी आ वासला.

"तेवढा दरवाजा बंद करा बाई जाताना."

"म्हणजे तू माझी हीच किंमत केलीस होय ? तू अगदी शांतपणे दरवाजा बंद करून आत्महत्त्या करायला मला सांग-तेस ?"

"त्यात काय झालं बाई. आत्महत्त्येची तुम्हाला चांगली प्रॅक्टीस आहे. कॉलेजात तुम्ही बऱ्याच वेळा आत्महत्त्या केल्याचं तुम्ही सांगितलंच आहे."

झाले, आपले तर हातपाय गळाले. प्रेमात सांगितलेली रहस्ये अशी हानीकारक ठरली तर !

आत्महत्त्येच्या कारणाचा कणाच मोडून पडला. आत्महत्त्या करून तिच्या मनावर जर परिणाम होत नाही तर मग आत्महत्त्या करून काय उपयोग ? असा विचार केला अन् त्याही वेळी आत्महत्त्या रद्द केली !

अजूनही मला प्रसंगोपात आत्महत्त्या करण्याचे झटके येतात पण सौभाग्यवती हवा तसा 'रेस्पॉन्स' देत नाही म्हणून मला नाईलाजाने ते विचार रद्दच करावे लाग-तात ! !

अस्मादिकांचे सामान्य मनोरथही पूर्ण होत नाहीत ते हे असे ! !

●●●

# एक्स्प्लोजन

**ती माझ्यासमोरून उठली नि एकदम माझ्यामागे आली... तिने माझ्या मागून आपला एक हात माझ्या हनुवटीखाली घातला नि दुसऱ्या हाताने माझे केस धरले नि खस्कन माझे तोंड वर केले... नंतर 'च्यक' असा आवाज झाला...**



**मुंबईत** फोर्ट विभागात काळा घोडा नामक स्थान आहे. पूर्वी तिथं एक काळा घोडेस्वार होता. काळ्या घोड्यावर आरूढ झालेला इंग्रजी उन्मत्तपणाचं प्रतीक वाटणारा हा पुतळा आता हलवला आहे. संग्रहालयात की कुठेतरी. त्याच्यापुढे म्युझियमकडे जाताना डाव्या बाजूला चित्रांच्या प्रदर्शनासाठी खास बांधलेली एक बैठी इमारत आहे. जहांगीर आर्ट गॅलरी तिचं नांव. समोरच्या काचेच्या दरवाज्यातून आत शिरलो की उजवीकडे एक सुंदर रेस्टॉरंट आहे. त्याचं नांवही त्या कलेच्या परिसराला साजेल असं कलावतुचं आहे. सामोवर. त्याला उजवीकडे घालून पुढे निघालो की वर जायला एक ओकाबोका लोखंडी जिना लागतो. हा जिना इमारतीच्या उघड्या छप्परावर नेऊन सोडतो. तसंच वळसा घालून पुढे गेल्यावर एक उघडी गॅलरी लागते. खऱ्या अर्थानं उघडी. तिला लहानसंच दार आहे. माझ्यासारख्या उंच माणसाला वाकूनच आत शिरावं लागतं.

आतल्या भागाला एक उंचापुरा, सुदृढ मल्लासारखा दिसणारा, ढगळ कुडता आणि पायजमा घातलेला कलावंत आपल्या कलेच्या साधनेत अहर्निश मग्न असतो. डाव्या हाती पॅलेट आणि ब्रशाचा झुबका आणि उजवा हात रंग लावण्यात गुंतलेला.








निर्जिव कॅनव्हासला सचेतन करण्यात रमलेला.

समोरच्या खोलीत त्यानं रंगवलेली चित्रं प्रदर्शनासाठी मांडून ठेवली असतात. अनेक जण येतात. ती बघतात. आतल्या भागात डोकावून त्या चित्रकाराच्या हातातून समूर्त होणारी कला कुतुहलानं, काहीशा आदरानं बघतात, पावलांचा आवाज होणार नाही अशी काळजी घेत परतात, जातात.

मी नेहमीच तिथं जायचा. तास अर्धा तास ती साधना बघत रहायचा. परतायचा; मनात अलोट समाधान आणि अननुभूत आनंद घेऊन.

अशीच ती इथं कधी तरी भेटली. समोरच्या कॅनव्हासवरच्या निसर्ग चित्राकडे बघत असलेली. मान वेळावून पाहणारी, त्यातील रंगछटांचे ओहोळ टिपणारी, त्यातील अर्थ वेचणारी. मला तिची तंद्री आवडली. असली प्रदर्शनं बघायला गेलो म्हणजे एखाद्या चित्राबद्दल आपलं मत कुणाला ऐकवावसं वाटतं, त्याचं ऐकावसं वाटतं. सहजच बोलणं होतं. त्याच उद्देशानं तिला म्हणालो,

"तुम्ही इथं नेहमी येता ?"

ती बोलली नाही. कदाचित आपला आगांतुकपणा तिला आवडला नसेल म्हणून मी एकदम संकोचून चूप झालो. पण तीच आपली समाधी मोडून म्हणाली,

"काही म्हणालात तुम्ही ?"

जरा दबकत म्हणालो,

"होय. इथं नेहमी येता का ?"

"हो. पुष्कळदा."

"आवडतात ही चित्रं ?"

"हो. चित्र तर आवडतातच. पण ही गॅलरीच आवडते. कलाकृती जन्म घेत असता क्रिएशनची ती प्रोसेस बघणं मला आवडतं."

"तुम्ही ओळखता त्या चित्रकाराला ?"

"नाही."

"मग तुम्हीही माझ्यासारख्याच."

"कलावंताशी ओळख करूच नये. होतं काय, मैत्री झाली म्हणजे कलावंत व रसिक हे नातं राहात नाही. वैयक्तिक जिव्हाळा निर्माण होतो आणि त्याच्या निर्मितीकडे तिऱ्हाईतासारखं पाहता येत नाही."

"खरंच."

बोलता बोलता बोलणं वाढलं आणि कॉफी घ्यायच्या निमित्तानं खाली सामोवरमध्ये केव्हा येऊन बसलो, कळलं नाही. तिची चित्रकलेवरची मतं बरीच आधुनिक होती. नवचित्रकलेच्या मागील इतिहास, तिच्यातील थिअरीज, प्रकार ह्यापासून तो आरा, हुसेन, रामकुमार, चावडा, आलमेलकर, डिसूझा ह्या आघाडीच्या चित्रकारांबद्दल, त्यांची विषयाची निवड, मांडणी, रंगाचा वापर, व्यक्तिगत रेखाटनाची वैशिष्ट्ये ह्या सर्वांवर ती बोलत होती. मला प्रश्न विचारीत होती.

खरं म्हणजे माझा कल क्लासिक् पद्धतीकडे. छायाप्रकाश, रेषांचा प्रभावी उपयोग, अन्वर्थक रंग आणि निसर्गाशी इमान हे माझे आवडते प्रकार. म्हणून निसर्गचित्रे,

## भास्कर उत्तरवार

व्यक्तिचित्रे आणि विविध कांपोझिशन्स् माझे आवडते.

पण मूलतः आवडी भिन्न असल्या तरी दोघांचीही पेंटिंगज्मधली आवड मात्र एकच असल्याने गप्पाना रंग चढला.

ही तिची पहिली भेट.

त्यानंतर ती बरेचदा भेटली. तिथेच. कुणाच्या ना कुणाच्या चित्रांचं प्रदर्शन असायचं. ती असायची आणि मी. आणि त्या चर्चा.

अशी एकदा भेटली असता म्हणाली,

"तुम्ही गेल्या कित्येक दिवसांपासून इथं येता. चित्रकारांच्या ओळखी झाल्या असतील तुमच्या."

"नाही. फारशा नाही. चित्रकार उपस्थित असला तर फार तर हस्तांदोलन होतं. त्याच्या वहीत आपल्याला त्याच्या चित्राबद्दल काय वाटतं हे लिहीतो त्यावेळी त्याच्याशी चार दोन शब्द बोलतो तेच काय ते."

"बस ?" ती हसून म्हणाली "अहो ओळखी आपण होऊन करून घ्यायच्या असतात. माझी अमक्या अमक्या कलाकाराशी ओळख आहे असं सांगण्यात मोठा अभिमान असतो."

"ते खरं आहे. पण आपलं कलाकाराच्या लांबच राहिलेलं बरं. अहो एकदा असा प्रसंग घडला की ह्या कलाकारांची धास्तीच घेतली मी. तेव्हापासून सहसा कुणाच्या जवळच जात नाही मी."

"म्हणज झालं तरी काय ?" तिनं डोळे बारीक करून कुतुहलमिश्रित मिस्कीलपणानं विचारलं.

"त्याचं असं झालं. कुणाशा एका नवीन चित्रकाराच्या चित्रांचं प्रदर्शन भरलं होतं इथं. नेहमीसारखा मी बघत होतो. जवळून, लांबून, कधी मान वेळावून, डोळे किलकिले करून. पुष्कळदा अर्थ समजत नव्हता. तरी पण समजावून घेण्याचा प्रयत्न करीत होतो. जवळच्या पत्रकावरून चित्राचं नाव, त्याचा विषय, त्याची किंमत आणि प्रत्यक्ष चित्र ह्यातील अन्वय शोधीत होतो. कधी लागत होता, कधी लागत नव्हता. अर्धीअधिक चित्रं बघून झाली असतील, कुणीतरी मागून विचारले,

"त्या अकरा नंबरच्या चित्राबद्दल काय वाटतं तुम्हाला ?..... दॅट थर्ड फ्रॉम द कॉर्नर ऑन राईट साईड......"

प्रश्न अचानक आला होता. वळून बघतो तो एक अस्ताव्यस्त टाईट पॅंट घातलेला, जाडजूड चष्मा लावलेला, पोट स्थूल झालेला, खरडल्यासारखी दाढी असलेला पण अतिशय भेदक नजर असलेला एक तरुण गृहस्थ एका चित्राकडे टक लावून पहात असलेला दिसला. कुठंतरी हरवल्यासारखा बघत होता. मला शंका वाटली आपल्याला भास झाला असावा. काही न बोलता पुढं सरकलो. पुन्हा सटकन् प्रश्न आला,

"यू डिड् नॉट रिप्लाय मी......."

"मला म्हणालात ?"

"यप्. यू-यू अँड यू ! ओळखतो तुम्हाला. नेहमी येता इथे." आणि मग माझा उजवा दंड करकचून धरून तो म्हणाला,







"दॅंड इज अ क्रिएशन ! अॅटम्स् ऑन अॅटम्स्—अॅटम्स् इन अॅटम्स् ! स्ट्रगूलिंग—फ्यूजिंग-डिफ्यूजिंग. एका भयानक आवर्तात सापडलेले. आणि एका क्रिएशनमध्ये गुंतलेले . . . येस्. दे आर क्रिएटींग . . . समथिंग अन्‌नोन. लूक लूक . . ." आणि मला सरळ ओढत तो त्या चित्राकडे घेऊन गेला. गृहस्थ जाम ऐकेना."

ती एकदम हसली. म्हणाली, "पुढं ?"

"पुढं काय, त्यानं मला त्या चित्रापासून चक्क एक दोन अशी पावलं मोजीत दहा पावलांवर उभं केलं आणि झपाटल्यासारखा म्हणाला, 'सी दोज कलर्स. ती कॉंबिनेशन्स. सारं उकळतंय्. पेटतंय्. अंतःकरणाच्या चिंध्या चिंध्या करतंय्. बघा . . . बघा . . . ह्या साऱ्या विश्वाला . . . . आय मीन् … युनिव्हर्सला एका प्रचंड खलबत्त्यात टाकून चिरडून चिरडून त्याचं भिरडं करण्याचा मूड येत नाही तुम्हाला हे चित्र बघून ?'

"खरं सांगू का त्या गृहस्थाचा तो भयानक अवतार, त्याची ती प्रचंड देहयष्टी, ती माझ्या दंडावरची मगरमिठी ह्या सगळ्यानी माझंच भिरडं व्हायची वेळ आली होती. विश्वाचं भिरडं करायचा कसला मूड येतोय् . . ."

ती एकदम खो खो हसली. मग आवरत म्हणाली,

"ही गोष्ट गेल्या एप्रिलमधली ना ?"

"होय."

"मग तो गृहस्थ कोण होता, माहीत आहे ?"

"नाही . . . . कां ?"

"अहो तोच सध्या आघाडीवर असलेला नवचित्रकार डॅग-डू. डीए जी-हायफन-डी ओ ओ !"

"म्हणजे ?"

"म्हणजे साधं 'दगडू' ! काय रोमॅंटिक टच् दिलाय त्यानं नावाला; नाही ?"

"होय, दिला खरा."

"हे नाव ऐकलं नाही कधी तुम्ही ?"

तिचा प्रश्नच असा होता की केवढं तुमचं अज्ञान असा अर्थ ध्वनित व्हावा. उगाच संकोचून म्हणालो, "माफ करा बुवा पण ऐकल्याचं आठवत नाही."

तिनं भुवया उचलल्या. ओठ दुमडून चक् असा आवाज काढला आणि खांदे उडवत विचारलं, "पुढं काय झालं ?"

"झालं काय ? त्या दिवसापासून चित्रं बघायची ती बघतो अन् चोरासारखा बाहेर सटकतो. चित्रकार कोण हे विचारायच्या भानगडीत सुद्धा पडत नाही !"

आणि त्यावर आम्ही दोघंही खळाळून हसलो.




एक 'मॉडर्न' विचार

मी बहुधा शनिवारी दुपारी तिकडे हटकून जात असे. ऑफीस दुपारी सुटल्यानंतर सावकाश आटपायच्या कार्यक्रमांपैकी गॅलरीला भेट देणे हा एक नियमित कार्यक्रम होता. कुणाच्या ना कुणाच्या चित्रांचं प्रदर्शन भरलेलं असायचंच. काही नसलं तर खालच्या तळघरातील अॅंटिक्विटीजच्या दुकानात रेंगाळायचा. तिथले जुन्या शिल्पकामाचे, धातूंच्या भांड्यांचे, चित्रांचे आणि विशेषतः हस्तीदंती मूर्तीचे नमुने बघत रहाण्यात गंमत वाटायची. त्या मूर्ती कोरणाऱ्या कलाकाराचे आणि त्याहेक्षाही त्यावर अफाट किंमतीची लेबले लावणाऱ्याचे कौतुक करीत ! नशीब, बघायचे पैसे पडत नसत. उगाच वाटायचं त्या मूर्ती बहुधा हिऱ्याच्या तुकड्याने कोरल्या असाव्यात !

असाच एकदा तिथं होतो. लक्ष दुकानातल्या वस्तूकड अर्धं आणि अर्धं ती दिसते का हे पाहण्यात.

एकदम आवाज आला.

"हॅलो देअर !"

मी एकदम वळून बघितलं. तीच होती. जाणीव झाली अरे आपलं नाव अजून तिला माहीत नाही, ना तिचं आपल्याला. वाटलं आपलं चुकलंच. साध्या मॅनर्सची आठवण राहिली नाही. अजून तिला तिचं नाव विचारलं नाही की आपलं तिला सांगितलं नाही. म्हणालो,

"माफ करा माझं . . ."

"नांव सांगणार का ?"

"हो कां ?" तिच्या खरखरीत आवाजावर चमकून विचारलं.

"नको !" तिचा तो नकार अगदी सहज आला.

"चला वर केमोल्डला श्रीनिवासन् नावाच्या दाक्षिणात्य चित्रकारांच्या चित्रांचं प्रदर्शन आहे."

मला खरं म्हणजे केमोल्ड ह्या नावाबद्दल आणि तिथल्या लोकांबद्दल एक धास्तीच होती. ते सारेच लोक अल्ट्रा मॉडर्न. झपाटलेले. काही तरी नव्याच्या शोधात असलेले. कोणत्या वेळी काय सादर करतील ह्याचा नेम नाही. त्यांचे हे प्रयोग मला

अनुक्रमणिका

मात्र नेहमीच भयानक वाटत. मी क्षणभर घुटमळलो. तिला ते जाणवलं असावं. एकदम हसून म्हणाली,

"घावरू नका तुमच्या दंडाला आवळून विश्वाला खलवत्त्यात कुटायची कामगिरी लादणार नाही कुणी तुमच्यावर तिथं !"

आता जाणं भागच होतं.

चित्रं बघितली. पूर्वी घरातून कुंकू आणि हळद ह्यानी सणाच्या दिवशी विशेषत: नागपंचमीच्या दिवशी भिंतीवर नागाच्या वाकडयातिकडया आकृत्या काढीत तशी काही चित्रं होती. ती सारी चित्रं बारकाईनं बघत होती. प्रसंगी मला समजावून सांगत होती. माझी प्रतिक्रिया जोखायला प्रश्न विचारीत होती. कधी उगाच हरवल्यासारखं बोलत होती. मी नुसता ऐकत होतो. हुं हुं करून मधुनमधून प्रतिसाद देत होतो.

नंतर खाली सामोवरमध्ये जाऊन बसलो तेव्हा तोंडाचा चक् असा आवाज करून म्हणाली,

"यू हॅव नॉट डेव्हलप्ड अ परस्पेक्टिव टोअर्डस् क्रिएटिव्ह आर्ट !"

तिच्या म्हणण्याचा रोख लक्षात आला. माझी नवचित्रकलेबाबतीतील उदासीनता तिला अभिप्रेत होती हे निश्चित होतं. पण असला शेरा ऐकून घेणं म्हणजे माझ्या दृष्टीनं अपमानाचंच होतं. पण खरं म्हणजे चित्रकला समजून घ्यायलासुद्धा मनाच्या फॅकल्टीज डेव्हलप करायच्या असतात हे मला माहीत नव्हतं. स्वत:ला सावरत म्हणालो,

"तुम्ही काय म्हणता हे कळत नाही मला. खरं म्हणजे मी इथं येतो ते इथली चित्रं बघायला. ती कळली समजली म्हणजे छान वाटतं. आनंद वाटतो.

"अगदी अनभिज्ञ अशा सामान्य माणसासारखं बोलता तुम्ही. अजूनही अनुकरणाच्या काळात आहात. जगात सारंच काही सहज समजण्यासारखं नसतं. पुष्कळसं समजून घ्यावं लागतं. अनेक गोष्टी गूढ असतात. कलाकाराची निर्मिती त्यापैकीच एक. तो अतींद्रिय पातळीवर गेला की त्याच्या मनाच्या त्यावेळच्या संवेदनेला आकार देतो. आणि मग त्याच्या नैसर्गिक पातळीवर येतो. त्या आकाराचे जनकत्व त्याच्याकडे असते एवढेच. बाकी प्रेक्षक ह्या नात्यानं तुम्ही आणि तो एकसारखेच"

हे एकून समजून घेणं कठीणच होतं. माझा चेहरा गोंधळला असावा. तिनं हाताची कोपरं टेबलावर टेकली. बोटात बोटं अडकवून त्यावर हनुवटी टेकली आणि आपले बॉब केलेले भुरे केस मागे झटकले. मग डोळे बारीक करून तिरक्या नजरेनं ओठ दुमडून छताकडे बघितलं. क्षणभर तशीच राहिली असेल मग नजर आणि मुद्रा तशीच ठेवून म्हणाली,

"चित्रकलेकडे बघण्याच्या तुमच्या कल्पना अगदी रूढ आहेत, जुनाट आहेत. त्या बदलायला हव्या. त्याकडे बघण्याची दृष्टी बदलायला हवी. ती बदलली म्हणजे कळणारा अर्थ बदलतो आणि तीच गोष्ट वेगळी भासायला लागते. आता हेच बघा. . . . . ."

ती उठली. केस नीट मागे सारून पिनानी नीट खोवले. टेबलाला वळसा घालून माझ्या मागे आली. मग एक तळवा माझ्या हनुवटीखाली घालून दुसऱ्यानं केस धरले आणि खस्स्कन तोंड वर केलं. मोजून माझ्या आणि आपल्या चेहऱ्यात दोन बोटांचं अंतर ठेवलं आणि तोंडानं चांगला च्यक् असा आवाज केला. मग आली तशीच वळसा घालून आपल्या खुर्चीवर बसली आणि समोरची कॉफी साखर घालून ढवळीत राहिली !

मी पार अर्धाच झालो होतो. घाबरून इकडे तिकडे बघितलं. काही अंतरावर तरुण-तरुणी बसले होते. आपल्याच गप्पात मश्गुल होते. थोडे लोक असल्याचं आणि कुणी बघितलं नसल्याचं बघून सुटकेचा निश्वास टाकला. अंगाला चांगलाच घाम फुटला होता !

"आता हे जे मी केलं ना ह्याला रूढ भाषेत चुंबन म्हणतात. संकेतांनुसार ते एकांतात घ्यायला पाहिजे. मी तसं घेतलं



## देशांवरली —

देशांवरली मनांत भरली
अट्कर ठुण्गा बांधाग
मराठमोळ्या मातीमधली
काळी सांवळी राधा ग.
छातीवरती कुरुंद काळे
आंत परि काळीज्–ससा
पाठीवरतीं लाल गोंडे
धोक्याचा कंदील जसा
तशात इर्कल झांक मारते
पात ग हिरवी कांद्याची
उगाच सर्कता पदर बावरा
दैना हळव्या खांद्याची
गाल फुगीचे दिवस सुगीचे
कशास त्रागा लट्का ग
दाताखाली पदर दाबुनि
खदकन् मारशी मुरका ग.
नेत्रांमधलां चैत्र पालवी
लाज लाजरी बाधाग
देशांवरली मनांत भरली
अट्कर ठुणगा बांधा ग.

—ह. शि. खरात

असतं तर तुम्ही आता हादरलात तसे हादरला नसता. घाम फुटला नसता तुम्हाला. कारण रूढ संकेतानुसार एखादी गोष्ट घडली तर ती तुम्ही सहज म्हणून स्वीकारता. तुमच्या मनाचं तसं कंडिशनिंग झालं आहे."

"पण मी मात्र आहे तशीच अन्डिस्टर्ब्ड आहे. कारण माझ्या लेखी ही क्रिया म्हणजे चुंबन नव्हे. हा मैत्री व्यक्त करण्याचा साधा आविष्कार. हस्तांदोलन करण्याइतपत सहज. मनाची अशी घडण

बदलली की एरवी सामान्यतः प्रतीत न होणारे अर्थ असे प्रतीत व्हायला लागतात. चित्रकलेचंही असंच आहे."

तिची ही समजावण्याची धाटणी अचाटच होती. एखाद्या अस्सल फ्रेंच पोरीच्याही थोबाडीत मारील अशी. मी स्वतःला सावरलं. तिचा राग आला. तिरिमिरीतच म्हणालो,

"हे बघा. तुमची मतं काय आहेत ह्याची पर्वा नाही. आय केअर ए हूट फॉर देम ! पण ती समजावून देण्याची ही काय तऱ्हा झाली ? इट इज अट्ररली आउटरेजस् !"

"येस्. इट इज डिझाइण्ड टु बी आउटरेजस् ! असं काहीतरी हादरून टाकण्यासारखं केल्याशिवाय तुमच्यासारख्यांची जुनाट अन् खिळखिळी झालेली मनं कोसळून पडत नाहीत. धक्का असा सणसणीतच हवा. तरच तुम्ही नव्या विचारप्रणालीकडे डोळे उघडून बघणार."

मी उठायला लागलो.

"डोण्ट् गेट अप. वीकनेस दाखवताहात."

मी पाय मोडल्यासारखा बसलो. बसणं, उठणं, बोलणं न बोलणं—साराच दुबळेपणा ठरला होता. वीकनेस ! मी बसून राहिलो. पुढ्यातल्या सँडविचशी चाळा करीत. तिच्या तोंडाचा शिस्तबद्ध आवाज येत होता. मान खाली असूनही ती आपल्याकडे कोणत्या नजरेनं बघत असेल ह्याची कल्पना करता येत होती. छे ! चित्रकलेचा हा सारा मामलाच सणसणीत ठरला होता. एवढ्यात तिचा आवाज आला—

"येत्या मंगळवारी एका नवीन चित्रकर्तीच्या चित्रांचं प्रदर्शन आहे इथं. फार बोल्ड चित्रं आहेत. विषयही तसेच बोल्ड. तुम्ही बघायला विसरू नका. अँड स्टॉप दॅट सिली मॉडर्न आर्ट ऑर अल्ट्रा मॉडर्न आर्ट बिझिनेस ! कोणतीच गोष्ट मॉडर्न नसते. कला कलातीत असते. काळ नसतो तिला. चुकीचे शब्द वापरता आणि मग चुकीचे अर्थ काढून समजत नाही म्हणून ओरडत बसता !"

मी अधिक बोललो नाही. खाली घातलेली मान वर करायची हिमतच होत नव्हती. किती वेळ गेला कुणास ठाऊक, पण मान वर केली तेव्हा तिची खुर्ची रिकामी होती !

हाही धक्काच.

तिनं सांगितलेलं प्रदर्शन बघायला गेलो नाही. वर्तमानपत्रात मात्र त्याबद्दलचे रिपोर्टस् चांगले होते. एक प्रयोगशील, धाडशी, चाकोरी मोडून नव्या प्रतिमा आणि कल्पना-चित्रांच्या माध्यमातून मांडणारी म्हणून चित्रकर्तीचा बहुतेक सर्व वर्तमानपत्रांनी गौरव केला होता. एक दोन स्तंभ लेखकानी मात्र विकृत, हिडीस वगैरे शब्द वापरून प्रखर हल्ला चढविला होता.

एरवी बघायला कधी चुकलो नसतो. पण मिळालेल्या धक्क्यातून अजून सावरलो नव्हतो. हा धक्का एवढा होता की हेच प्रदर्शन काय पण त्यानंतरची माधव सातवळेकर चेतन ह्या माझ्या आवडीच्या चित्रकारांची आणि आतापर्यंत कधी न चुकविलेलं कॅगचं वार्षिक प्रदर्शनसुद्धा बघितलं नाही. त्या गॅलरीची, त्या सामोवरची आणि एकूण तिथल्या वातावरणाची एवढी धास्ती बसली होती. केवळ आवड म्हणून लागलेल्या सवयीचा असा परिणाम होऊन बसला होता !

त्यानंतर बरेच महिने लोटले. मधुनमधून जायच्या उर्मी येत होत्या. टेरेसवरील त्या कलाकाराच्या नवीन कृती बघायची इच्छा होत होती. त्याची ती अखंड साधना मूकपणे खुणावीत होती. त्याची ती सुंदर निसर्ग दृश्यं आवर्जित होती.

आणि एक दिवस गेलो. आंतरिक ओढ अधिक प्रभावी ठरली. ती आता भेटली तरी तिच्याकडून नवचित्रकलेची थिअरी ऐकून घेणार नव्हतो. तिला चार गोष्टी सुनावणार होतो. ज्याला ती बोल्डनेस म्हणते तो एक उच्छृंखलपणा आहे हे जाम गळी उतरवणार होतो तिच्या. विश्वाच्या गूढ समस्यांच्या पाठीमागे लागून पिसाटपणा करण्यापेक्षा निसर्गाशी तद्रूप होऊन साकारलेली जुनी क्लासिक आर्ट हीच कशी श्रेष्ठ आहे हे तिला पटवूनच तिला सोडणार होतो. भले त्यासाठी तिला डाफरावं लागलं तरी ते करणार होतो. तिला रडकुंडीला आणणार होतो !

पायऱ्या चढलो आणि काचेच्या दरवाज्याच्या पुढला बोर्ड वाचला तो त्याच चित्रकर्तीच्या चित्रांच्या प्रदर्शनाचा. तिनं माझ्याजवळ जिची भलावण केली होती तिच्या. एक धाडशी चित्रकर्ती म्हणून वर्तमानपत्रांनी जिचा उल्लेख केला होता तिच्याच ! म्हणजे एवढ्या अल्पावधीत तिनं दुसरं प्रदर्शन घडवून आणलं होतं. एकूण खराच डॅश होता तर तिच्याजवळ !

चित्रं बेफाटच होती. ती रंगवण्याची पद्धत, वापरलेली साधने, माध्यम, रंग, कॅनव्हास. सारंच अचाट. आणि नावं ? . . . "एक्स्प्लोजन ऑफ सेक्स", "ब्रेन ऑन द डायनिंग टेबल." स्त्री-सारखी वाटणारी वेडीवाकडी आकृती. तिच्या खाली नाव होतं "पेट्रोलियम जेली." एक वेडीवाकडी खडबडीत पृष्ठभागावर वाहणारी आकृती. नाव "फ्लोईंग ह्युमॅनिटी." असंच पुष्कळ. अक्षरशः बेफाट. माझ्या आवाक्यावाहेरचं. वाटलं ही चित्रं काढणारी व्यक्ती स्त्रीच असेल का ?

आणि मग अचानक विचार आला, छे ! हे सारं समजायला आपल्या मेंदूत रुतून बसलेल्या जुन्या कसोट्या काढून फेकल्या पाहिजेत. उगाच इकडे तिकडे बघितलं. ती दिसते का ते बघायला.

ती होती. दारात. कुणाशी तरी बोलत. एक ग्रेस होता. अधिकाराची जाणीव होती. घरी येणाऱ्या पाव्हण्याशी यजमानीण बाईनं बोलावं तसं ती बघणाऱ्यांशी आब राखून बोलत होती. एकदम शंका आली. . . . . .

आणि ती अखेर खरी ठरली ! तिच्या स्वतः च्या चित्रांचंच प्रदर्शन होतं ते !

जाताना तिथं थांबलो. अगदी जुजबी प्रश्न आला "वूड यू केअर, सर, टु राईट युवर ओपिनियन" तिनं वही पुढं केली. ती घेताना तिच्याकडे निरखून पाहिलं. जुन्या ओळखीची पुसटशीसुद्धा रेषा नव्हती तिच्या डोळ्यात. शेजारचा एक अनोळखी माणूस आणि मी एकच !

काही न लिहिता ती वही तशीच परत केली आणि बाहेर पडलो.

पुढं ? पुढं कुणास ठाऊक काय आहे ते !

• • •

## मोठी चूक

नोकराच्या एकापेक्षां एक चुकीने मालक अगदी कंटाळून गेले. ते त्या नोकराला उद्देशून म्हणाले, 'तुला नोकरीवर ठेवले हीच मी मोठी चूक केली.' नोकर चटकन् म्हणाला साहेब, आपल्या चुकीपेक्षा माझी चूक काहीच नाही.

## घड्याळ मागे राहते

"बाबा, बाबा, आपल्या बाळग्याने घड्याळ खिडकीतून आताच टाकले."

"अरे मर्खा, मग आधी धाव! खाली जाऊन उभा रहा. आणि पडलं की झेल. कारण ते माझं घड्याळ नेहमी पांच–सात मिनिटे मागे रहाते."

## सबब

एका गिऱ्हाइकाकडील उधारीची थकबाकी वसूल करण्यासाठी व्यापाऱ्याने एक युक्ती योजली. बिलाबरोबर एका तरुण मुलीचे छायाचित्र जोडून त्याने गिऱ्हाइकाला लिहिले, 'हिच्यासाठी मला पैशाची फार गरज आहे, बाकी लौकर चुकती करावी.'

गिऱ्हाईकही मोठे खमंग होते. त्याने आपल्या नवरेल बाय-कोचेच छायाचित्र पाठवून सोबत लिहिले, "हिच्या कारणामुळेच मी लौकर पैसे पाठवू शकत नाही."

## लायसेन्सची भानगड

दोन व्यक्ती एका घनदाट जंगलात शिकारीला गेले होते. अचानक एक शिपाई त्यांच्याजवळ येऊन त्यांना आपापलं लायसन्स दाखवायला सांगू लागला. एवढं ऐकलं मात्र तोच एकजण त्या शिपायाच्या देखत जीव घेऊन पळू लागला. शिपाई पण काही कमी नव्हता. त्याने त्याचा दूरवर पाठलाग करून त्याला पकडले. त्याने लगेच खिशातून आपले लायसन्स काढून शिपायाला दाखवले. शिपायाने विचारले, "तुझ्याजवळ लायसन्स होते तर तू असा पळालास कां?"

तेव्हा त्याने उत्तर दिले, 'कारण माझ्या मित्राजवळ लायसन्स नव्हते!'

## कमाई

एक माणूस रस्ता चुकून त्याने आपली मोटार एका जुनाट रस्त्यावर आणली. रस्त्यात पुष्कळच चिखल होता. चिखल एवढा होता की मोटार पुढे जाताच चिखलात रुतली. तेव्हा मोटारीतून उतरून जवळच्याच शेतात ट्रॅक्टर चालवत असलेल्या खेडूताला त्याने बोलावून आणले.




चुरचुरीत, खुसखुशीत आणि खमंग फरसाण

खेडुताने तत्परतेने आपल्या ट्रॅक्टरने त्या माणसाची मोटार चिखलातून काढून दिली. मोटार काढल्याबद्दल त्याने पाच रुपये मागितले. मोटारवाला म्हणाला, 'अशा रीतीने दिवसरात्र चिखलातली मोटार काढून तू फारच कमाई करत असशील?'

'छे! छे! काहीतरीच सांगता राव. रात्री तर मी कमाई करू शकत नाही. कारण त्यावेळी मी या कच्च्या सडकेवर पाणी शिंपडण्याचे काम करतो. खेडूत म्हणाला'

–जयप्रकाश महाम्बरे

## वाशा आणि काशा

वाशा आणि काशा ही जोडी एका कारखान्यात कामाला होती. मालकाच्या पत्नीने एकदा कारखान्याला भेट दिली तेव्हा वाशाला त्यानी नाव विचारले. त्याने सांगितले 'वाशा'. त्यावर त्या म्हणाल्या, "असे नाव सांगू नये, चांगले 'वासुदेव' म्हणावे." हा संवाद काशा ऐकत होताच. नंतर त्यानी काशाला नाव विचारले, तेव्हा तो म्हणाला, 'वासुदेव'!

## तडजोड

एकदा एक मंत्री प्रवासाला निघाले. दोनच बर्थ असलेला फर्स्ट-क्लासचा डबा त्यांच्यासाठी राखून ठेवलेला होता. गाडी सुटण्या-पूर्वी मंत्रीमहाशय स्टेशनवर येऊन हजर झाले. डब्याशी जाऊन पाहतात तो त्यांच्या दोन्ही जागा दोन तरुण नि सुंदर स्त्रियांनी पटकावलेल्या होत्या. चौकशीअंती समजले की त्याना आपल्या गावी ताबडतोब जावयाचे असल्यान त्यानी त्या डब्याचा ताबा घेतला होता. मंत्री म्हणाले, "ते काही असले तरी माझा कार्यक्रम आधीच जाहीर झालेला असल्याने मला या डब्यातून गेलेच पाहिजे. तेव्हा तुम्ही दोघींनी खाली उतरावे." नंतर थोडा वेळ विचार करून ते म्हणाले, "एक तडजोड मी सुचवितो. तुमच्यापैकी कोणाही एकीला मी माझ्या या खास डब्यातून न्यायला तयार आहे."

०००




....अत्यंत गोंधळलेले तिचे शरीर पुढे सरकले.... तिच्या ओठांचा स्पर्श नि डोळ्यात उरलेला थेंब त्याच्या चेहऱ्यावर एकदमच टेपावले.... पण ती लगेच मागे सरली....

**मानवी वेदना-संवेदनांचा कल्लोळ माजविणारी एक प्रदीर्घ प्रीतीकथा**



**मी** आल्याशिवाय राहणार नाही. तू त्याच नदीच्या पाण्यात खेळत रहा... माझ्या या छोट्या प्याल्यातील पाणी कधीतरी संपेलच ... पण तहान ? ... ही तहान न् हा प्याला ! ...

त्याच प्रवाहात तुझे पाय सोडून बाजूच्या खडकावर माझी तू वाट पहा ... माझी ही सपाट वाट उद्या संपेलच ... पण हे पायाचे चक्र ? हे चक्र न् ही वाट ! ...

तू तिथेच थांब ... मी आल्याशिवाय राहणार नाही !

* *

ज्या वस्तीत दारे सताड उघडी असतात व जाणाऱ्या-येणाऱ्याना धंदेवाईक उत्साहाने दारातून आत घेतले जाते पण अशांच्या आठवणी ठवण्याची ज्या ठिकाणी रीत नसते अशा वस्तीपासून थोडे दूर आणि थोडे अलिप्त असे एक दार ... दुसऱ्या मजल्यावर ....प्रशस्त गॅलरीच्या मागे ...आतील निळसर प्रकाश बारीक तिरीपांचे हात उंचावत बाहेर आलेला ...

पण दार सताड उघडे नव्हते. काचेच्या मण्यांचा व पुंगळ्यांचा पडदा जडपणे दारावर पसरला होता. आणि आतील प्रकाशाच्या रंगात, स्वतःच्या हेलकाव्यांबरोबर थोडे थोडे अनपेक्षित रंग सोडीत होता.

मल्हारने रस्त्यावरून त्या पडद्याकडे वर पाहिले. तो थांबला. काही माणसांचे धक्के व अभिप्राय त्याला सहन करावे लागले. त्याला आश्चर्य वाटले; गॅलरीत किंवा दारात कोणी उभे नाही ! कोणी 'या' म्हणत नाही ! एकदा वाटले, परत फिरावे ... यात अर्थ नाही ... इथवर आलो, ज्या कल्पनाना जवळ घेऊन आलो, त्याना इथे स्थान मिळेल ? त्याच्या मुकाटपणे उभे राहण्याकडे पाहून हळूच एक माणूस जवळ आला. थोडे घाबरल्याचे सोंग करून नकली अदबीने म्हणाला—"साहेब थांबले कां ? आत या ..." हे ऐकून पुन्हा तोच विचार उसळला......याला काही अर्थ नाही. माझ्या ओघळलेल्या भावनाना, विचारांना इथे सावरणं कसं शक्य आहे ? हे ठिकाण मी निवडलं ... पण ... परत जावं का ?—

पण पुन्हा त्या माणसाने अदबीने तसेच बोलावल्यानंतर, स्वतःच्या नकळत मल्हार जिना चढला ... गॅलरीची दहा-वीस पावलांची रुंदी संपली व तो काच-मण्यांच्या पडद्याला टेकून बाहेर






उभा राहीला. त्याला घेऊन येणारा माणूस परत फिरला होता . . . . गॅलरी थोड्या अलिप्त अंधाराने भरली होती. आता तिथे कोणीच नव्हते. दुसरीकडेच मुद्दाम मान वळवून बसलेली गॅलरी त्याच्या मागे व पुढे छातीशी काच-पुंगळ्यांचा रंगी-बेरंगी पडदा . . . . मधूनच वाऱ्याचा धक्का लागला की छातीजवळ येणारा व मग हळूच किण्किण् मागे जाणारा !

तो उभा होता. पुढच्या क्षणी तो आत गेला असता की परत फिरला असता, हे त्याला किंवा पुढच्या क्षणालाही माहीत नव्हते . . . काही क्षण गेले. हळूहळू अंधारी व मान दुसरीकडेच वळवून बसलेली गॅलरी काहीशा आश्चर्याने जागी झाली . . . प्रकाशली . . . .

आपल्या डोक्यावरचा लालसर दिवा लागताच दचकून मल्हारने वर पाहिले. त्याच वेळी इथवरच्या शांततेवर प्रचंड भासणारी काच-मण्यांची खळबळ उडाली . . . दचकून मल्हारने पुढे पाहिले . . हाताच्या दोन बोटांवर काच-पुंगळ्यांची एक रेषा सावरीत ती उभी होती ! तिच्या चेहऱ्यावर वरचा लालसर प्रकाश काटकोनाने पडला होता व मागच्या निळसर प्रकाशाने तिची शरीर-कडा हलकी रेखली होती . . . इच्छा-विचार-धाडस नसतानाही क्षणभर मल्हारची दृष्टी तिच्या आकृतीवरून ढळू शकली नाही . . . . तो पुन्हा गोंधळला व मान सरळ वर करून, त्याने अस्वस्थपणे हलवली . . . .

त्याचा हात तिने केव्हा धरला व त्याला आत केव्हा ओढले, त्या अवस्थेत त्याला समजले नाही . . . एका कोचावर तो बसला. त्याच्या शेजारी ती बसली . . . काही मिनिटे तिने वाट पाहिली. त्याची अस्वस्थ मान खाली येत नाही हे पाहून ती थोडी जवळ सरकली व त्याच्या हाताला स्पर्श करून म्हणाली—"इथे इतके हळू व्यवहार कसे चालतील ?"

. . . . हा आवाज ! तिला पाहिल्यावर तो एक क्षण कुठेच नव्हता . . . . तिचा आवाज ऐकल्यावर त्याने तिच्याकडे अत्यंत उत्सुकतेने पाहिले . . . . यावर गमतीदार रीतीने ती हळूच हसली . . व तिने मान दुसरीकडे वळविली . . . . मल्हारही जागा झाला . . . काही वेळाने त्याच्या सुकलेल्या जीभेवरून एकएक तुटक शब्द निखळला——

"तू समजतेस तसं नाही . . . मी इथे कायमचा राहण्यास आलो नाही . . ."

त्याच्या या तुटक उद्गारानी ती दचकली व त्याच्याकडे आश्चर्याने पाहू लागली. पाहता पाहता तिला हसू आले—"हे काय नवीन सांगितलं ? इथे कायमचं राहण्यास कुणीच येत नाही . . ."

"नाही . . . त्या अर्थानं नाही . . . पण नाही . . ."

"इथे तुम्ही येता . . . आणि जाता . . . यावं आणि जावं असंच हे ठिकाण आहे . . . ."

"तुला समजलं नाही . . . यायला अन् लगेच जायला मी इथे आलो नाही . . . पण . . . पण मी कायमचा राहणार नाही . . ."

"जास्त रहा . . . एक . . . दोन . . . तीन . ."

"नाही . . . . मी किती दिवस थांबणार आहे, मला माहीत नाही . . . . कदाचित अनेक दिवस . . . ."

हे ऐकून तिला जास्तच गंमत वाटली ! "अनेक दिवस ? . . . . माझी हरकत नाही . . . पण . . . तुम्हाला हे जमेल ?"

या प्रश्नाने तो सावरला. गोंधळ थोडा कमी झाला. तोंडाची कोरड कमी झाली. ओठांवरून जीभ फिरवीत म्हणाला—"थोडं पाणी हवंय् मला . . . ."

ती सावकाश उठली व पाणी घेऊन आली. पाणी पिऊन त्याने प्याला बाजूला सारला. व त्याला वेगाने गोल फिरवीत तो बोलू लागला, "मला जमेल का . . . काय जमेल का ? . . . तुला काय वाटतं आहे मला माहीत नाही . . . पण मला काही जमलं नाही . . . पण जास्त जागाच कुठे आहे ? . . . एकतर बाहेर . . . किंवा . . . इथे . . . बाहेर जमलं नाही . . . इथे मला जमेल का . . . ए . . . बावळट आहेस तू . . . मी इथे प्रेमबीम करायला आलो नाही . . . तुझा धंदा आहे . . . मला माहीत आहे . . सारं माहीत असून इथे आलो आहे . . . पण बरेच दिवस राहीन . . . हे बघ, एक उपकार कर. मला . . . जा म्हणू नको . . . . मी कायमचा राहण्यास आलो नाही . . . ."

बोलता बोलता मल्हार पुन्हा अस्वस्थ झाला. प्याला गोल फिरत होता. त्याला सोडून तो उभा राहीला. दारावरच्या काच-मण्यांच्या हेलकाव्यांकडे त्याचे लक्ष गेले. त्याने खिशातून दहाच्या तीन-चार नोटा काढल्या व स्टुलावर ठेवून तो तडक बाहेर पडला ! दचकून

## भास्कर ज. कविमंडन

ती उभी झाली ! स्टुलावरचा अजून फिरणारा प्याला . . . दारावरचे हेलकावणारे रंग . . . स्टुलावरचे पैसे . . नुसते पाहात काही क्षण तिने काढले . . . मग मंद गतीने ती गॅलरीत आली. खालचा निर्जन रस्ता . . . रात्रीचा बारा-एकचा प्रहर . . . एका बाजूला तिचा माणूस उभा होता. तिने हलकी टाळी दिली. तिच्या माणसाचे लक्ष वर जाताच तिने हुकूम दिला—"खालचं दार बंद कर . . . . तू घरी जा . . ."

रात्री साडेअकराच्या सुमाराला नवी गाडी तिच्या माडीसमोर आवाज न करता आली व थांबली. दार उघडले. मल्हार बाहेर आला. तिचा माणूस लगबगीने पुढे आला. मल्हार तुटकपणे म्हणाला, "मला माहीत आहे. तू येत जाऊ नकोस. . . ." त्याच्या हाती दहाची नोट देऊन मल्हार जिन्याच्या पायऱ्या चढू लागला . . . तेच . . . कालचेच वातावरण . . . तशाच परस्पराना छेदणाऱ्या सौम्य प्रकाशरेखा . . . किंचित् अंधारलेली व नवीन माणूस येताच खटचाळपणे दुसरीकडे पाहणारी रुंद गॅलरी . . . मंद झोके घेत दारावर पसरलेला काचमण्यांचा पडदा . . . पण एक नवीन होते . . पडद्याच्या किणकिणीतून स्पष्ट जाणवणारे . . . तंबोऱ्याचे सूर . . एकच सूर निघायचा व तो पूर्ण दूर गेल्यावर त्याच्याशी लांबवरून संवाद साधणारा दुसरा सूर उमटायचा . . . . गॅलरीत पाऊल टाकल्यावर तीच अत्तराची झुळुक . . . तोच निळसर प्रकाश . . .







आज मल्हार बाहेर थांबला नाही. काचमणी बोटांवर सावरीत त्याने वाट करून घेतली, व आत पाऊल टाकले . . . तिला त्याच वेळी त्याची चाहूल लागली . . . . क्षणभर त्याच्याकडे पाहून ती प्रसन्न हसली . . . .

"या !"

"हं . . ."

"कां, कालचे पैसे परत नेणार ? . . ."

"हं !" त्यालाही थोडे हसू आले. तो कोचावर बसला, मांडीवरचा तंबोरा तिने सावकाश बाजूला केला. त्यावर मखमली आवरण टाकले, व ती त्याच्या बाजूला येऊन बसली,

"पाणी आणू ?"

"नको . . ."

"कां . . . तहान लागली नाही . . ."

"नाही . . ." त्याचे उत्तर ऐकून ती गमतीदार हसली ! दोन-तीन मिनिटे पडद्याच्या हालचालीशिवाय दुसरी कसलीच हालचाल नव्हती. तंबोऱ्याकडे पाहात ती खालच्या आवाजात म्हणाली, "पैसे आणले असतील . . . तर . . . ठेवून द्या . . ." यावर त्याने आश्चर्याने विचारले, "कां ?"

"कां म्हणजे काय ? इथे पैसे द्यावेच लागतात . . . ."

"हं . . . मला माहीत आहे . . ."

". . . मग ठेवून द्या . . . आणि . . ."

"आणि काय ?"

"आणि . . . निघून जा ! . . ." वाक्य तिने शब्दानी पूर्ण केलेच नाही . . . ती ताड्कन् उठली. तिच्यातील हा आकस्मिक बदल पाहून मल्हार भांबावला.

"म्हणजे मला हे सांगण्याची गरज नाही."

ती किंचित खाली वाकली व एका दमात बोलून गेली, "तुमच्या गरजा मला ठाऊक नाहीत . . . माझी इच्छा पण नाही . . . तुमच्या गरजा . . . तुमचे पैसे . . . तुमची गाडी . . या साऱ्याना इथे केवळ शिष्टपणानं थांबण्याची मला मात्र गरज नाही . . ."

"या रागाचं कारण ?"



"मला माहीत नाही . . . तुम्ही जा ! . . . . इथे माणसं येतात . . . पण . . ."

"पण मी देखील आलोच आहे ना . . ."

"इथे माणसं येतात . . . त्यांच्यातील फरक मला कळतात . . . तुम्ही इथे येऊ नका . . ."

"मला कुणाची भीती नाही . . ."

"हे . . . . ही दिखाऊ ऐट इथे ओळखू येते . . . ."

"छे . . . काहीतरी बोलतेस . . . ."

"नाही . . . मी बरोबर ओळखते माणसाना. तुमची गरज मी नाही . . . माझी ही कोठी नाही . . . माझं गाणं नाही . . ."

"हं !"

"तुम्हाला हे जगणं समजत नाही . . . तुमचं जगणं मला बघायचं नाही . . . . तुम्ही . . ."

"जातो . . . असं पुन्हा पुन्हा ऐकण्याइतका मी कोडगा नाही . . मल्हार उठला व दहाच्या काही नोटा स्टुलावर ठेऊन दाराकडे वळला . . . ती त्याच्याकडे पाहात होती . . . पण काही बोलली नाही. तितक्यात तिचा माणूस घाईने वर आला–"मुक्ताबाई . . ." तो पुढे बोलला नाही . . . त्याच्या घाईवरून तिने काय ते चटकन् जाणले . . . मल्हारला ती म्हणाली, "या माणसाच्या मागे जा . . . तिकडून जाऊ नका . . ." मल्हार मागे वळला . . . एकदा तिच्याकडे त्याने पाहून घेतले आणि स्वतःशीच तो बोलला–"तुझं नाव मुक्ता आहे . . . ?"

यावर ती जोराने म्हणाली, "हो . . ."

* *

रात्र . . . साडेअकरा–बारा . . . मागील प्रसंगानंतर एक-दोन आठवडे गेलेले . . . . तिच्या माडीपुढे मल्हारने गाडी उभी केली . . . तिच्या माणसाची घाई . . . .

"तुला सांगितलं होतं मी . . ."

"हो . . . हो . . . मला आठवतं. हो साहेब ! . . . पण . . . तुम्ही इतके दिवस कुठे गेले होते ? . . ."

"म्हणजे ? . . . ."

"माफी करा सरकार पण आमच्या बाईंनी तुमची चौकशी केली होती . . ." हे ऐकून जिन्याकडे वळलेला मल्हार थांबला . . "काय ?"

"हां . . . म्हणाल्या दार उघडलं कां नाही ?"

"हं . . ."

"मी म्हणालो, साहेब मी असताना तरी आले नाहीत."

"हं . . ."

"सरकार . . . मला तुमच्याकडे जा म्हणाली बाई . . ."

"काय ?"

"पण मला तुमचं घर माहीत नव्हतं . . ."

"हं . . ." म्हणून मल्हार जिना चढू लागला. तंबोऱ्याचा मंद आणि थांबत थांबत पसरणारा आवाज कानी आला. मल्हार दारात गेला व त्याने काचमणी दूर केले . . .

"तुम्ही . . . !" तंबोऱ्यावरील बोटाना हळूच हलवीत ती

तशीच प्रसन्न हसली. "तुम्ही आलात . . . या . . ."

"नाही म्हणालीस तरी आलोच आहे."

"इथे यायचं तर इथली रीत थोडी तरी शिकायला नको का ?"

"शिकव . . ."

"हं ! . . . कुठे होता इतके दिवस . . ."

" . . . "

"दुसरी सोबत मिळाली ?"

" . . . "

" आज आमची कां आठवण झाली ? . . "

" . . . . "

" पाणी हवंय् का ? . ."

आणि हा खटचाळ प्रश्न ऐकून मल्हार मनापासून हसला . . ती म्हणाली—

" आता बसा ! "

तो कोचावर बसला. त्याच्या शेजारी ती बसली . . तिच्या पावलांवर त्याची दृष्टी रेंगाळली . . . . मेंदीने रंगविलेली गोरी पावले . . . दृष्टी वर निघाली . . आणि हळू हळू त्याने तिच्या पूर्ण आकृतीला शांतपणाने पाहिले . . . तारुण्याचा तो अत्यंत सुंदर आविष्कार ! . . . पाहून तो अशांत झाला ! . . . त्याला समजून ती तशीच गमतीदार हसली . . म्हणाली, " झालं ? "

"अं . . हो . . झालं . . "

" काय झालं ? "

" . . . . मुक्ता . . तू हा . . हा . . धंदा करतेस ? . ."

" हो . . कां? "

" पण म्हणजे खानदानी पद्धतीनेच ना ?"

" खानदान ! . . आम्हाला काय कळतं ?"

" . . . . मला तुझं हे घर दाखव . . "

" चला ना . . " म्हणून उत्साहाने तिने त्याचा हात धरला व त्याला ओढले. सहा-सात प्रशस्त व नवीन खोल्यांचा तो एक ब्लॉक . . साऱ्याच खोल्यांवर बेफिकीर ऐश्वर्याने ऐटदार हात फिरवलेला . . . दुसऱ्या खोलीतील एक प्रचंड नक्षीदार पलंग आणि रेशमी पडद्यांची झिरमिर व पुढच्या खोलीतील गालीचांची बैठक, गायनाचे सारे साहित्य व सहासात पानांची चमकदार तबके जर सोडली तर हे घर त्या भडक वस्तीच्या जवळपासदेखील जुळण्यासारखे उरले नव्हते . . . .

तो पुन्हा पुढच्या खोलीकडे जाऊ लागला. तशी ती म्हणाली—

" इथेच बसा . . "

" इथे ? . . ."

" कां . . इथला खरा महाल हाच आहे . ."

" पण गाण्याची मैफल पुढे आहे . . मैफलीतील कलाकाराने इथे ह्या खोलीत कुणाला बोलावू नये . . "

हे ऐकून ती थोडी गंभीर झाली . . " पुन्हा तेच . . तुम्ही कुठे आलात, तुम्हाला कळलं ना ?"

" हो . . "

" हो ! . . सुंदर आहे . . बहारीचे क्षण देते . . बहारीचे क्षण घेते . . पण . . इथे एक . . वेश्या राहते . . "

" मुक्ता ! . . "

" गंमत आहे . . दचकलात . . . आपल्या भाषेत तोच शब्द आहे . . काय वाईट आहे ? . . एक धंदा . . बघा चांगला भरून आलाय् . . धंदा वाढला की छाती अभिमानानं फुगते ना ! . . . हा कारखाना . . याचं उत्पन्न लाखानी मोजावं . . शेकडो मजूर येतात . . पोट भरतात . . किती समाधान ! . . . . मला कां नसावं समाधान ? . . . "

त्याने सुस्कारा टाकला . . " ठीक आहे . . मला समजलं . ."

" म्हणूनच . . इथे बसा . . "

तो मधल्या खोलीतच थांबला. तिने त्याचा हात धरला व रेशमी पडदा दूर करून त्याला त्या उंच पलंगावर बसवले . . मंद हसत ती आत गेली . . व एका हाती बाटली व दुसऱ्या हाती दोन प्याले घेऊन बाहेर आली . . तिने प्याले भरले . . हळूच स्टुलावर ठेवले . .

" तुम्हाला यात सोडा पाहिजे ?"

तो नुसताच पाहात होता.

" हे काय आहे, लक्ष आहे ना ! . . याला चांगला शब्द . . म्हणजे . . मद्य !"

" मी घेत नाही . . "

" मी घेत नाही ? . . देव घेत होते ! . . घ्या . . . "

" नको . . "

" मी घेऊ ? . . "

" घे . . "

तिने शांतपणे प्याला संपविला. खुदकन् हसून खाली ठेवला . . रिकाम्या प्याल्याकडे पाहात मल्हार म्हणाला—

" तू माझी आठवण कां काढलीस ?"

" कुणी सांगितलं ?"

" कां काढली ? . . इथली ही रीत नाही ! . . "

" . . वेडे आहात . . मी आठवण काढली म्हणजे तुमच्या प्रेमात पडले, असं वाटलं का ? . . "

" मला काहीच वाटलं नाही . ."

" मग मलाही काहीच वाटलं नाही . . "

" मग आठवण कां झाली !"

तिने खालचा ओठ दाताखाली घेतला व खालच्या आवाजात ती रुक्षपणे म्हणाली— " पैशाची गरज होती . . "

" काय ? " मल्हारने दचकून विचारले व यावर ती खळखळून हसली.

"कळलं ? . . माझा खर्च फार आहे . . पैशांची गरज होती . . ."








अनुक्रमणिका

मल्हार उठला . . खिशात हात घालून त्याने काही नोटा काढल्या व रिकाम्या प्याल्याजवळ ठेवल्या . . पलंगावर बसून ती हळूहळू पायाना झोके देत होती . . नोटांवरची दृष्टी न हलविता बसली होती . . मल्हार निघाला व पुढच्या खोलीत आला.

काच-भण्यांचा पडदा त्याने दूर केला व आतून तिचा आवाज आला . . "जाऊ नका . . "

तो थांबला. सावकाश ती बाहेर आली. त्याच्याजवळ उभी राहिली. किंचित लालसर डोळ्यानी मल्हारला तिने टक दिली.

"चला . ."

"नको . ." मल्हार बाहेर गॅलरीत बघत तुटकपणे बोलला.

"चला . . घावरू नका . . माझं काही विशेष काम नाही . ." तिने त्याचा हात हिसक्याने उचलला व त्याला आत ओढले . . त्याच्या पैशाजवळ उभे करून ती म्हणाली, –"मला दान नको आहे . . पैसे परत घ्या . . "

"नाही ग . . हे दान नाही . . पण मला जे हवं . . जसं हवं . . ते अजून पुढे येत नाही . . ."

"काय ? . . इथे दैवानं आलात म्हणून असं बोलताहात . . . अगदी . . अगदी पारख नाही तुम्हाला . . . मी कुठे जाते . . कुणात मिसळते . . त्याचा कोण गर्व करतं . . याची तुम्हाला कल्पना नाही . . . मला तुमचे पैसे नको . . उचला . . . "

"नाही . . "

"पण तुम्ही कां देताहात ? . . पैसे काही विकत घेतात तुम्हाला काहीच नको . . तर ते घेऊन जा . . "

"मला काही नको आहे . . असं नाही . . "

"मग घ्या ना . . "

"नाही . . अजून काही तसं वाटत नाही . . "

"हं ! . . तुम्ही इथे कां येता ? . . तुमचे पैसे उचला . . आणि जा . . "

"मुक्ता . . पुन्हा तेच जा . . . जा म्हणू नको . . तुला पैशांचा व्यवहार जर इतकाच कळत असेल तर . . असं समज . . माझ्या इथे . . उभं राहण्याचं ते भाडं आहे . . . "

"इथे काय विकायचं ते ठरलं आहे. "

"हं ! . . . तू फारच विश्वासानं बोलतेस ! . . कोणी काय विकायचं व कोणी काय घ्यायचं हे बाजारातसुद्धा इतकं लवकर ठरत नाही . . . तुला जे विकायचं अन् मला जे घ्यायचं . . . त्याचाही मेळ बसला पाहिजे . . . इतक्या व्यवहाराच्या तुझ्या गोष्टी . . . आणि एवढं साधं समजत नाही ? " . . . गंभीर आवाजात, दूरवर पाहात मल्हार बोलला. . . व हे असे प्रथमच ऐकायला मिळते अशा भावनेने ती गोंधळून गेली . . . . मल्हारच म्हणाला, "तुझा हट्टच असेल . . . तर . . मी पैसे परत नेतो . . . पण न्यावेसे वाटत नाही . . ."

तिने थोडा विचार केला . . म्हणाली – "असू द्या . . ."

हे ऐकून मल्हार गॅलरीत आला व जिन्याकडे वळला.

" थांबा जरा . . " ती पुन्हा पुढे आली. त्याच्याकडे पाहात म्हणाली–

" हे बघा . . तुम्हाला रात्री इथे थांबायचं . . नाही . . इथे विश्रांती घ्यायची असेल तर . . नाही हो . . तुम्ही शांत झोपा . . . " हे ऐकून मल्हार समाधान पावला . . तोच काटकोनाने येणारा लालसर प्रकाश . . तिची शरीर-लय हलक्या स्पर्शाने रेखणारा तो मागचा निळसर प्रकाश . . . मल्हार . . मंद . . हसला ! . . तिच्या गालावर हलकेच थोपटून तो झर्रकन् जिन्याकडे वळला.

. . किती वेळ . . किती वेळ ती गॅलरीत उभी होती ! . . . तिच्या माणसाने तिथे येऊन जेव्हा सांगितले –" बाई . . खाली सेठ आलेत . . "

" अं . . . हं . . . पाठवून दे . . . "

जड पावलानी ती आत गेली . . . .

* *

गाडीतून उतरून मल्हार तिच्या माडीपुढे थांबला. हातातील गजरा त्याने हळुवार बोटांवर झेलला व जिन्याकडे तो निघाला . . पण दार बंद होते. आश्चर्याने त्याने एकवार पाहिले. तितक्यात तिचा माणूस घाईने आला.

" कां रे . . . दार . . . "

" थांबा सरकार . . आणखी एक दोन तासानी. "

" कां ?"

"वर सेठजी आहेत . . "

"हं . . " झर्रकन निराशा, दु:ख, खंत यांनी त्याचा चेहरा बदलला . . गाडीचे दार उघडून तो आत बसला व वेगाने गाडी निघून गेली . . .

* *

आज मल्हार बराच उशीर करून आला. जिन्यावरून अस्थिर मन:स्थितीत जात असताना त्याला जाणवले, आज तंबोऱ्याचा नाद नाही ! . . .

तो आत गेला. पुढच्या खोलीत मुक्ता नव्हती . . मधल्या खोलीत गेल्यावर त्याला दिसले, मुक्ता पलंगावर झोपली आहे . . त्याने पाऊल मागे घेतले. . . पण पुन्हा थांबला . . आवाज न करता तो पलंगाजवळ गेला.

उशांवर थोडे अंतर रुळून–पसरून पलंगाखाली घसरलेले केस ! चेहऱ्यावर झोपेतही तेच खट्याळ हसू ! . . पलंगापुढील खुर्चीवर तो बसला आणि काही वेळाने झोप अनावर होऊन, त्याची मान मागे टेकली . . .

. . तो जागा झाला, तेव्हा ती त्याच्याजवळ रेलली होती . . . त्याला हलवून म्हणत होती, " इतकी झोप ! . . . . तुम्हाला घर नाही का ?"

यावर मल्हार जागा होत फक्त हसला.

" तुझी झोप झाली ? . . "

" मला उठवलं कां नाही ?"

" इतकी थकलीस ?"

" हं . . वाट पाहून . . "

" कुणाची ? . . "

"हं !"

" आज सेठजी आले नाहीत ?" मल्हारचा हा कुडा प्रश्न ऐकून ती ताडकन् उठली . . .

" सेठजी ? . . . "

"हो . . काल आले होते ते . . "

" अस्सं . . . म्हणजे ते असताना तुम्ही काल आला होता तर !"

" हं . . मला का–य माहीत . . तुझ्या सहवासाचा कितीकाना अभिमान वाटतो ! . . . "

" पुरे झालं . . . मी तुमची प्रेयसी नाही असं सुनवायला . . "

" पण हे सेठजी कोण आहेत ?"

" हे घर त्यांचच आहे . . "

" हं . . त्याना इथे येऊ दिलं नाही तर . . . "

" माझा खर्च फार आहे . . . "

" मागे हे ऐकलं मी . . . "

"तुमच्या तीस–चाळीस रुपये रोजात माझं चालणार नाही . . "

" मुक्ता, तुझं हे नेहमीचं बोलणं फारच रुक्ष अन् रुपयात टणटण वाजणारं असतं बुवा ! . . "

" बोलण्याचं कौतुक इथे ना–ही . . "

" हा कौतुकाचा केवळ प्रश्न नाही . . . "

" आ : ! प्रश्न काय आहे न् काय नाही . . . जे हे आहे ते असं . . . . दिवस न् रात्री इथे कशा जातात हे तुमच्यासारख्या येणाऱ्याना कळत नाही . . सारखं . . सारखं काहीतरी निघून जात आहे . . एवढंच जाणवत . . . हा वे–ग . . "

" वेग ?"

" वेगच . . मजजवळून घेऊन जाणारा . . "

" आवडतो तुला ?"

" . . . आवडतो ? . . . खरच आवडतो मला . . . आम्हाला आणि आवडी–निवडी . . . पण . . . खरंच आवडतो मला . . . कशाला फसवू . . हा वेग आजकाल मला समजू लागला आहे . . . "

" . . . काल मी गजरा आणला होता या वेगासाठी ! . . . "

"च् . . च् . . !"

" चेष्टा नाही . . पण तू आत बंद . . आपल्याला नाही हे आवडत . . "

" जाऊ द्या . . . आज कां नाही आणला गजरा ? "

" नाही आणला झालं . . . सुकलेले गजरे ठेवायला जागा नाही, . . . "

" असं कां ! . . . नका आणू . . . "

ती थांबली . . खट्याळ हसून तिने मोकळे केस सावरून पुढे घेतले . . . म्हणाली, " . . पण या . . माझे केसच जरा गुंफून द्या !"

मल्हार क्षणभर गोंधळला.

" या ना . . . "

मल्हार तिच्याजवळ गेला . . एक क्षण तिच्याकडे पाहिले आणि तिचा चेहरा दोन्ही तळव्यात हळूच घेऊन त्याने किंचित् वर उचलला . . . .

अनुक्रमणिका






. . . . . ( तू दिलेला प्याला लगेच ओठाना लावून देण्याशिवाय आणखी कोणते सुख असू शकेल . . . तू दिलेले जीवन लगेच जगून जाण्याशिवाय इथे माझे आणखी काय कार्य असू शकेल . . . तू दिलेली हाक ऐकून लगेच येथून तुझ्याकडे धावून येण्याखेरीज आणखी कोणती झेप असू शकेल . . . . )

ती खटयाळपणे त्याच्याकडे बघतच होती . . . तो म्हणाला, " मुक्ता . . मला तुझ्या सोबत यायचं आहे . . "

" कुठे ?"

" तुझ्या सोबत काही दिवस जगायचं आहे . . . "

" म्हणजे ते प्रेम . . ते लग्न . . तेच ना ?"

" . . . तुझा हा वेग . . हा रस . . हे ऐश्वर्य . . तुला समजतं की नाही मला माहीत नाही . . . पण मला याचा अनुभव घ्यायचा आहे . . ."

" मला काही समजलं नाही . . ."

" . . तू तिच्या पेक्षाही फार सुंदर आहेस . ."

" कोण ती ? "

" . . . तिला भावनानी भारलं आहे . . विचारानी झुकवलं आहे . . ती चालते . . पावलं रेखीव पडतात . . . ती बोलते . . गोड मध झिरपतो . . तिला निष्ठा लाभल्या आहेत . . तिला स्वप्नं आहेत . . . तिला आकांक्षा आहेत . . . तिला . . तिला माझ्याकडून फार अपेक्षा आहेत . . . ."

"मला काही कळलं नाही . ." किंचित् भांबावून मुक्ता म्हणाली . . तिच्या केसात हात खुपसून मल्हार अस्वस्थ उद्गारला –"तुला का–ही कळलं नाही ? . . . हं . . . मलाही काही कळत नाही . . . पण . . पण मला हे काहीच कां कळत नाही ? . . ." पाहता पाहता मल्हारची मान बाजूला वळली व त्याने डोळे झाकले . . . .

* *

तिने मोठ्या आरशासमोर एक गिरकी घेतली. रेशमी गुलाबी साडीतून दिसणारा आपला तरुण साज बघून ती तसेच खटयाळ हसली. वेणी पुढे घेऊन तिने हळूहळू उमलणारा जुई–गजरा बांधला . . वेणी मागे सारून तिने लाल चुटुक पदर नीट लपेटून घेतला आणि सारी उभार वलये त्या लाल पदरामागे झाकली गेली . . . गॅलरीत येऊन तिन हलकी टाळी वाजवली . . तिचा माणूस पळत वर आला . .

" गाडी आली नाही ?"

" नाही . . तुमचं झालं की फोन करा म्हणाले . . "

" अरे मग जा कळव की . ."

तिचा माणूस पळत मागच्या खोलीत गेला व फोनवर निरोप देऊन परतला.

कोचावर ती शांत बसून राहिली . . . गॅलरीच्या अंधारातून दूर पलीकडे काळ्या आकाशाचा तुकडा दिसत होता . .

चांदण्यानी गच्च भरलेला . . .

काही वेळाने गाडीचा हलका हॉर्न वाजला. ती उठली. ती जिन्यापाशी येताच तिचा माणूस म्हणाला, — " मुक्ताबाई . ."

ती थांबली.

" अकरा वाजलेत . . "

" . . . "

" साहेब आले तर . ."

हे ऐकून ती मागे फिरली . . दोन क्षण तिने त्याच्याकडे रोखून पाहिले व पुन्हा माघारी वळून जिन्याच्या पायऱ्या उतरताना ती बोलली – " मी गाण्याच्या मैफलीत गेले म्हणून सांग . . . "

* *

" हे माधवराव . ."

" नमस्कार . ."

" नमस्कार ! "

" मोठे जमीनदार आहेत . . लीडर आहेत ! . . लाखानी उत्पन्न आहे . . . "

" अरे वा !"

" तुम्हाला भेटून फार आनंद झाला . ."

" मला भेटून सगळ्यानाच आनंद होतो !"

" वा . . वा ! इतकं घरंदाज काम आपण अजून पाहिलं नव्हतं हां !"

" हे फार श्रीमंत आहेत. "

" इथे पैशांचा हिशेब नसतो . . "

" म्हणजे . . केवळ दिलेर वृत्तीलाच महत्त्व आहे ना ?"

" नाही . . इथे बेहिशेबीपणानं पैसा घेतला जातो . . "

हे ऐकून पाहुणे थोडे अस्वस्थ झाले. " हरकत नाही . . माझी तयारी आहे . . तुमची ?"

" माझी आहेच ! . . उद्या क्लबात या . . . हा माझा फोन नंबर . . "

तिने पानाचे तवक पुढे केले व ती उठली . . पाहुण्याना बरेच बोलायचे होत . . . . पण ते चुप्प बसले . . पान न घेताच ते निघाले . . . कसले तरी दडपण . . .

* *




'भाऊनाका'










" आज या वेळी ? . . " मल्हारला येताना पाहून हातातील टॉवेल बाजूला टाकीत ती आश्चर्याने उद्गारली . . . " आत्ता कुठे आठ वाजलेत . . .बारा साडेबाराची ही वेळ नाही . . " मल्हार काही बोलला नाही . . तिने वर बांधून घेतलेले केस खाली सोडले . . लाल रिबीनीने बांधले . .

" थांबा जरा. मी आत्ता येते . ."

काही वेळाने फिक्या जांभळ्या साडीच्या रेशमी लहरीतून ती हलकेच डुलत पुढे आली . . . मल्हारकडे पाहून प्रसन्न हसली.

" या वेळी स्नान ?"

" स्नान नाही . . पण तसंच काहीसं . .यानंतरच आमचं काम सुरू करायचं असतं ना ! . . . पण तुम्ही सात आठ दिवस कुठं गेला होता ?"

" आम्ही ? . . हं ! . . तुमचा बिझीनेस् फार जोरात होता म्हणायचा !"

ती हसली . . " म्हणजे तुम्ही येऊन गेलात ?"

" भुंगे आले काय न् गेले काय, उमलणाऱ्या कलिकेला त्याचं का–य ?"

" अरेरे ! हे अगदीच शेरशायरीसारखं झालं अं !"

" कां . . आवडत नाही ?"

" तुम्हाला आवडतं ?"

" मला ? जाऊ दे . . तू गेल्या आठवड्यात सारखी बाहेरच होतीस ?"

" दोन–तीन दिवस सेठजीबरोबर गेल होते . . परगावी . ."

" कोणीही बोलावलं की अशी कशी तूं मागे जातेस ?"

" म्हणजे ? . . जायला नको ?"

यावर मल्हार बराच वेळ काही बोलला नाही. मग म्हणाला, "मी बोलावलं तर . ."

" येईन . . "

" कुठंही "

" कुठंही !"

" मी फसवल तर . . . "

आणि हा प्रश्न ऐकून ती मोकळी हसली. "मला फसवणार ?" हसू तिने आवरले व थोडी गंभीर होत म्हणाली, " फसवायचं म्हणजे काय करायचं ?"

" म्हणजे ? . . म्हणजे काय . . मी तुला प्रेमानं जवळ घेतलं . . माझ्या वासनांचा – भावनांचा वर्षाव तुझ्या जीवनावर केला . . तुझ्या तारुण्याला भरपूर चाखलं . . काही वचनं दिली . . अनेक स्वप्नं रंगविली . . . काही आकांक्षा दिल्या . . . अनेक अपेक्षा निर्माण केल्या . . . आणि . . . आणि एक दिस तुला एकटीला या साऱ्या गर्दीत सोडून देऊन मी निघून गेलो तर . . ?"

हे सारे एकाग्र चित्ताने ती ऐकत होती . . काही वेळाने किंचित् हसून तिने मान हलविली, " मला तुम्ही म्हणता ते समजलं नाही . . पण तारुण्य . . शरीर यांचं म्हणाल तर . . ते मी आजवर पुष्कळांना दिलं आहे . . ."

" तू असं कां करतेस ?"

" तुम्हाला आमचं हे कसं समजावं ?"

" हे पाप वाटत नाही . . .?"

"वेश्या आणि पाप हे शब्द ऐकून मला आजकाल दचकता येत नाही . ."

" स्वतःला वारंवार तू वेश्या कां म्हणून घेतेस ?"

" म्हणजे काय ? . . मी आहेच . . "

" तुला याचा अभिमान वाटतो ?"

" अभिमान ? . . मला माझ्या सौंदर्याचा, तारुण्याचा वासनांचा . . . आणि या . . या . . तहानेचा फार अभिमान वाटतो . . ."

" मी तुझ्या या धंद्याविषयी बोललो . ."

"तुमचा धंदा . . ."

"माझं एक असू दे ग . ."

" मान न् अपमान ! . . . ."

" . . तू वेश्या कां म्हणवून घेतेस ?

अशा प्रकारे स्वैर जीवन घालविण्याऱ्या तरुणी या शहरात आणखी नसतीलच, असं नाही . ."

" मला इतरांचं माहीत नाही . . पण माझं मात्र सरळ आहे . . मी माझ्या आईची एक मुलगी . . माझा बाप आणि त्याचं नाव . . आईनं सांगितलं नाही . . आज या घराचा जो थाट आहे, त्याच दर्जाचा आईच्या वेळी होता . . गायनाच्या बारी झडायच्या . . माणसं झिंगून यायची . . झिंगून थकून जायची . . . तुम्हाला एक सांगितलं तर खरं वाटणार नाही . ."

" काय ?"

" आईनं माझी फार काळजी घेतली . . . गायन मास्तर . . नाचाला मास्तर . . . होताच . . . पण बरीच वर्षं एक शाळामास्तरही माझ्यासाठी घरी यायचा . . . "

मल्हारला थोडं आश्चर्य वाटलंच . . .

" तुझी आई ?"

" ती दोन वर्षांपूर्वी वारली . . . . . . माझं आता इथे . . कोणी . . . नाही . . . . खरं म्हणजे आई जाण्यापूर्वीच ती मला मेली होती . . लहानपणी मला काही कळलं नाही . . थोडं वय वाढताच कळलं की आईचं हे वेश्याजीवनच आहे . . . आई म्हणायची आपण साध्या नाही . . खानदान . . . आपली घराणी . . . मला तिने एक सेठ पाहून दिला . . . पण काय ! एकूण एकच . . . तिला मात्र शेवटपर्यंत भीती होती . . . मी कशी जगेन ? . . .

" मग ? "

" . . तिच्या समोरच मी माझे काही रंग उधळले . . . व ती समाधानानं मेली ! . . ."

" . . . तुझं समाधान ? . ."

" मी असमाधानी नाही ! . . . अजून तहानलेली आहे . . . समाधान . . हं ! . . ."

"किती माणसं इथे येतात . . . तुझं शरीर असं कां नासवून टाकतेस ? . . सौंदर्याला आम्ही जपतो . . त्याची







अनुक्रमणिका

पूजा मांडतो . . दुकान नाही . . फुलं प्रेयसीच्या केसात माळतो. पण पूजेची रम्यता त्यात असते . . . आम्हीही स्पर्श करतो . . . आम्हीही परस्परांच्या छातीशी विलगतो . . . पण तेही क्षण निवडून . . . हे सारं करण्याला आम्ही एक आकार देतो . . देऊ शकतो . . . काही संस्कार मिळवतो . . . "

तिने हे ऐकलं. व थोडे हसून ती म्हणाली, "तुम्हाला चांगल्या बाईचा अनुभव दिसत नाही ! . ."

"हा अनुभव !" मला आश्चर्य वाटतं . . कमळाच्या पाकळ्यांचा रंग न् स्पर्श असलेले हे तुझे तळहात . . . तू कुठेही टेकतेस ! . . . कुणालाही स्पर्श देतेस ! . . . अगदी पूर्ण . . . पूर्ण . . . तुझं हे देखणेपण . . . तू कुणालाही पाहू देतेस ! . . . तुझी तहान . . तहान आहे ! . . . असेल . . . पण कोणताही प्याला ओठाना लावतेस ! . . . अत्यंत रम्य स्वप्नाना तुझ्या सारख्या रूपाची अपेक्षा असते . . . तुझ्यासारख्या रूपाला अशा स्वप्नांची . . तहान असते . . ."

" तुम्ही काय बोलताहात ?"

" . . मला बाईचा अनुभव नाही म्हणालीस ! . . . वेडी ! . . . तुला वाटतं तसं नाही . . तुझ्या अर्थानं मी सोवळा नाही . . . मला अनुभव नाहीत ? . . . मला अनुभव आहेत . . . मला अनुभव देण्यात आले आहेत . . . मुक्ता ! मला अनुभवात ठोकण्यात आलं आहे . . . ." अत्यंत अस्वस्थपणे मल्हार जवळ जवळ ओरडला . . . आणि ती अक्षरशः दचकली ! त्याचे खांदे हलवीत म्हणाली, "हे काय ? . . . काय बोलताहात ? . . . शांत व्हा . . . जरा . ."

" मी शांत होणार ? मी शांतच आहे ! . . . वेग तर तुला मिळाला आहे . . अर्थ तर तिला कळला आहे . . . तुझी तहान . . तुझा वेग . . . तिचा अर्थ . . तिचे जी–व–न ! . . . ."

"विसरून जा . . "

" . . . प्रियकर न् प्रेयसी यांचं नातं काय असावं ? . . चंद्र न् चकोराचं नातं काय असावं ? . . . चातक न् वर्षेचं नातं काय असावं ? . . . वा . . . वा ! अशी नाती . . . अशी नाती . . . नात्यांची रांग . . . रांग . . . माळ . . . माळाच माळा . . मी घातल्या आहेत . . ."

" मला तुमचा अपमान करायचा नव्हता . . ."

" सौंदर्याला कोंदण असावं . . . सभ्य शालीनतेचं . . . वासनाना सूत्र असावं . . . पुनर्जन्माचं . . . साफल्याचं . . . प्रेमाला वाट लाभावी . . . नवीन . . . नवीन स्वप्नांची . . . नवीन आकांक्षांची . . . "

" थांबलात ? . . बोला . . ."

पण हे ऐकून मल्हार चूप्प बसला . . . काही वेळाने त्याने तिच्याकडे एकटक पाहात विचारले –"तुझ्या जवळ हे काहीच नाही ? . . तुला हे समजत नाही ? . ."

हा प्रश्न ऐकून दचकून ती उभी राहिली . . . डोळे मिटून म्हणाली " मल्हार . . . तुम्ही इथून जा . . . हा सौदा फार महागडा होतोय् . . . मला परवडत नाही . . . मला सोसत नाही . . तुम्ही जा . ."

" मी थांबणार आहे . ."

" नको . . तुमचं जग वेगळं आहे . . तुम्ही . . असं वाटतं . . मोठे आहात . . तुम्ही इथे येऊ नका . ."

" मी मोठा आहे ! . . . मी येऊ नको ? . . माझं जग . . तुझं . . . "

"हो . . . तुम्ही बोललात ते मला कळत नाही . . . आणि कळत नाही हा काही मी गुन्हा करतेय् . . . हे पण मला जाणवत नाही . . ." एकेक शब्दावर हलका जोर देऊन उचारलेले हे वाक्य ऐकून मल्हार ताड्कन उठला. तिच्या जवळ जाऊन त्याने दोन्ही तळव्यात तिचा चेहरा घेतला. किंचित् वर उचलून तो खिन्न हसत म्हणाला, "तुला हे कळत नाही ? तुला हे पटत नाही . . ? खरंच . . .?"

" नाही . . . नाही . . " तिने स्वतःची सुटका करून घेतली.

" . . . पण मला तरी हे कुठं कळतंय् ? . . . हे माझं नाही . . हे माझं नाही . . "

" म्हणजे ? . . " तिला आश्चर्य वाटले.

" हे सारं तिचं आहे . . तिच्या जगाचं . . सारं ती आहे . . . ती माझ्यावर फार प्रेम करते. . . . " मल्हार मटकन् पलंगावर बसला . . आश्चर्याने मुक्ता त्याच्याजवळ गेली . . म्हणाली, "ती कोण ? . . ."

" . . . मलाही समजत नाही . . वासनाना वस्त्रं असावीत म्हणजे काय ? . . . भावनाना सीमा असाव्यात म्हणजे काय ? . . प्रेमाला आकांक्षा असाव्यात म्हणजे काय ? . . . "

" मल्हार ! . . पुन्हा . . ."

" . . . तिनं प्रेम केलं . . पण मी . . मी इथं आलो . . मी इथं कां आलो ? . . तू न् तुझं हे जग . . . मला थोडं कळतं . . . इथे प्रेम मिळणार नाही . . . पण प्रेम म्हणजे तिचं ते . . ते . . मला प्रेम जमलं नाही . . . मला प्रेम नको आहे . . नको आहे . . ."

" मल्हार, ती कोण आहे ? मल्हारने उत्तर दिले नाही. . . . त्याने खिशात हात घातला. पैसे काढले व समोरच्या टेबलावर ठेवले . . थकून उशीवर अंग सोडून तो पसरला . . . थकून म्हणाला, " आज . . हे पाहा . . आज मला जायला सांगू नको . . मला आज पाय नाहीत . . ."











यावर मुक्ताने पुढे वाकून मान हलविली . . . "असं कां म्हणता ? . . . तुम्ही झोपा . . ." त्याच्या कपाळावरचा घाम तिने हाताने पुसला आणि त्याच्या डोळ्यात पाहात ती दूर झाली . . .

मोठा दिवा तिने बंद केला न् ती तेथून निघून गेली . . .

* *

पहाटेच मल्हारला जाग आली. . . ती सुरांच्या विस्ताराने . . .तो उठला. रात्री एकदाही त्याला जाग आली नव्हती. . सारी रात्र. . आपण इथे काढली ? . . आलापांची गुंफण बाहेरच्या खोलीतून येत होती. . . मुक्ताचा आवाज त्याने जाणला. तृप्त हसून तो बाथरूमकडे निघून गेला. . काही वेळाने त्याच्या लक्षात आले, गाणे थांबले आहे. . स्वच्छ होऊन तो बाहेर आला.

दोन तीन बायांची साफसफाईची गर्दी चालू होती. त्यांच्यातून वाट काढीत तो मधल्या खोलीत आला. तिथेही स्वच्छता चालू होतीच. पलंगावरची चादर बदलली होती. उशांचे अभ्रे बदलले होते. खालची नक्षीदार फरशी धुतली जात होती. त्याने रात्री स्टुलावर ठेवलेले घड्याळ बांधले व पाहिले. . साडेपाच . . . "इतक्या लवकर ही धामधूम ! . . .आज काही प्रोग्रॅम आहे का ? "

"नाही साहेब. . हे रोजचंच. ."

तो हसला. आणि बाहेरच्या खोलीत आला. चंदनधूपाने खोली भरली होती. तीन टेबलांवरील फुलांच्या काचदाण्या जुईच्या फुलांनी गच्च भरलेल्या. . .सारे अत्यंत प्रसन्न. . .अत्यंत स्वच्छ. . मंद निळसर दिवा फक्त रात्रीची थोडी आठवण जपत होता. . . गालीच्याच्या मधोमध पाठमोरी ती बसली होती.

तंबोऱ्यावर हात चाळवीत मधूनच तार छेडीत समोरच्या उघडच्या दारातून दिसणाऱ्या लालसर उजळत्या आकाश-तुकड्याकडे ती एकटक बघत होती. पांढऱ्या तलम साडीतून, पूर्ण झाकून उरलेले, गालीचावर पसरलेले तिचे मोकळ केस त्याने पाहिले . . . तो थोडा पुढे झाला. .

"मी कुठे आहे ? "

त्याच्या प्रश्नाने ती दचकली व सावरून उठली. . .

"तुम्ही ! " त्याच्याकडे पाहात ती प्रसन्न पहाट झाली. . म्हणाली–

"झोप झाली ? "

"झाली . . . "

"काही त्रास ? "

"काही नाही. . " थोडे इकडे तिकडे पाहून तो म्हणाला, "इतक्या पहाटे आज कसली गडबड आहे ? "

हसून ती उत्तरली, "या वेळी तुम्ही पहिल्यांदाच आलात. ."

"रियाज चालू होता ? "

"हं. . "

"कां थांबवला ? "

"रोजचाच. . . "

"म्हणूनच. . कां थांबवला ? "

"पुरेसा वाटला ! . .असू दे. . तुमचा चहा ? . . बसा. . आणते मी. ."

चहा झाल्यावर त्याने विचारले–

"तुझी झोप. . ? "

"झाली ! "

"काही त्रास ? "

"बराच. . . ! "

"काय ?". . आणि उत्तराऐवजी ती गमतीदार हसली. तो उठला.

"मी जातो. . "

"कुठे ? "

"म्हणजे ? . . मला घर नाही का ? . . "

"मला काय माहीत ? . . तुम्हाला घरबीर सगळं आहे की काय ? . ."

"सगळं आहे ! . . घर आहे. . इस्टेट आहे. . व्याप आहे. . तुला काय वाटलं ? . . मी डाकूगिरी करून तुला पैसे देतो ? "

यावर ती उगीच हसली. . म्हणाली "खरंच, ती. . ती तुमची वाट पहात असेल. . नाही ? "

"कां ? माझी कोणी वाट पाहू नये ? माझ्यावर कोणी प्रेम करू नये ? "

"तुमच्यावर ? . . . कोणत्याही तरुण स्त्रीनं पाहताच भान विसरावं असं तुमचं शरीर. . "

"शरीर ? . . . शरीरावर प्रेम करत नसतात ! . . .

"मला तुमचं शरीर आवडतं. . "

"प्रेम मनावर करतात. . . "

"मला शरीर आवडतं. . . समजतं. . " जरा थांबून तिने वाक्य पूर्ण केले–

"मला. . ते हवंय् . . . "

मल्हार निघाला. .

"ठीक आहे. . मी जातो. . "

"खरच की. . . मी विसरलेच. . तुम्ही इथे कायमचे राहणार ना–ही ! . ." नाटकीपणाने ती बोलली.

तिचा हात जवळ घेऊन त्याने कुरवाळीत म्हटले, "मी तुझा आभारी आहे. . "

"वा ! . . . हा निरोप ? "

"नाही . . खरंच आभारी आहे. . . "

"काय दिलं मी ? "

आणि हसून तो उत्तरला, "शांत झोप ! " यावर तिने निळसर दिवा बंद केला. पहाट-प्रकाश खोलीत पुरेसा आला होता. त्याच्याकडे पाहात मोकळेपणाने हसून ती म्हणाली, "मी झोप दिली ? . . खरच दिली ? . . ." आणि क्षणभर त्याच्याकडे रोखून पाहात तिने विचारले, "काल काय झालं होतं ? . . माणसं. . माणसं इतकी अस्वस्थ असतात ? . . . "

या प्रश्नाने मल्हार गंभीर बनला व गॅलरीत जाऊन म्हणाला.

"मी येतो. . "

"येतो ? "

"हं. . . "

"खरंच ? "

"वाट बघशील ? . ."

अनुक्रमणिका






ती यावर हसली.. मल्हार जिना उतरू लागला...

(मी तर रोज येते रे!

तू तुझ्या दुःखात कसा बुडून असतोस! ..कसे ढळवू तुला मी?

मी तर रोज अशी बाजूला उभी असते रे!

तू तुझ्या व्यथेला कवटाळून असतोस!

कशी तुला बिलगू मी?

तुला काय इतकं मिळालं आहे?...

माझी साधी आकृतीही तुला दिसत नाही!)

* *

एका रात्री दीड–दोनच्या वेताला मल्हारची गाडी तिच्या माडीसमोर थांबली.. सारी वस्ती सामसूम होती... जिन्याचे दार बंद होते..

क्षणभर त्याने विचार केला.. गाडीतून बाहेर पडलेले पाऊल आत घेतले व व्हीलवर डोके टेकवून तो पडून राहिला..

"...सरकार....तुम्ही?.." तिच्या माणसाच्या हाकेने तो जागा झाला.

"इथे कां थांबले? ..."

"......"

"वर चला..."

"वरती कोण आहे?" गाडीच्या काचेतून दूर पाहात मल्हारने दिवे बंद केले व किल्ली फिरवून गाडी सुरू केली..

"कोणी नाही सरकार.. बाई झोपली आहे..."

हे ऐकताच त्याच्या हाताने नकळत गाडी बंद केली. दार उघडून तो जिन्याकडे वळला.. गॅलरी झोपली होती... काचमणी दिसत नव्हते. आतील अंधार कळत नव्हता... अडखळत त्याची पावले आत गेली.

मधल्या खोलीत मंद प्रकाश होता. पडदा दूर करून तो आत गेला.

रेशमी पडद्याआडच्या पलंगावर ती झोपली होती. मस्तक उशांवरून घसरले होते. आणि हात छातीवर दाबलेले होते.

त्याची पावलं बाहेर थांबली.. लाजेने... संकोचाने.... संतापाने... गोंधळाने.... फटकारे मारल्यासारखा तो मटकन् खाली बसला. आणि त्याला नको असताना, त्याचा लांब सुस्कारा दूर गेला..

....दचकून ती जागी झाली. उशाजवळचे बटण दाबून खोलीत प्रकाश आणला. आणि फरशीवर बसलेला मल्हार तिला दिसला. झरझर तिचा चेहरा बदलला...अनेक रेषांनी अनेक भाव आणले.. टाळले... साडी आवरत ती पलंगावरून खाली उतरली....

"हे काय?....केव्हा आलात?"

"..."

"उठा..."

तिने त्याला पलंगावर बसविले आणि त्याच सुस्काऱ्यासारखा तो पलंगावर पसरला... बराच वेळ कोणी काही बोलले नाही. शेवटी त्याच्याकडे पाहून ती तसे गमतीदार हसू शकली व त्याच्या चेहऱ्याचे ताणही अकस्मात तुटल्यासारखे झाले...

"येईन म्हणालात.. आज आलात!"

"...."












(आजकाल आम्ही तुला भेटत नाही...
"कां" विचारू नको...
आज तुझ्याकडे आलो आहे.
"जा" असे सुचवू नको..
आज तुझ्यासाठी जे आणले आहे, ते
उघड्या डोळ्यांनी पाहू नको...
आम्ही तुला दिले..
पण आता हात मागे घेऊ नको...)

"दहा पंधरा दिवस कां आला नाही?..."

"मी इथे नव्हतो.."

"कुठे गेला होता...?"

"जरा काम होतं.. व्याप मोठा करून ठेवलाय्.. थोडा सांभाळायला गेलो होतो.."

"खोटं... इतके दिवस व्याप नाही आठवला!"

"नाही. खरंच.. द्राक्षाचं पीक हातचं जाणार होतं.. आठ दिवस मळ्यातच होतो."

"एरवी कोण पाहतं?"

"काका आहेत."

"मग?.. आता वेगळे झालात?"

"नाही.."

"काकांना कां नाही पाठवलं?"

"मीच गेलो.."

"म्हणजे इथे यायचं नव्हतं! ..."

"मला नेलं..."

"काय हे?... इतके दिवसानी आलात, ते असं खोटं बोलायला?" ती किंचित् संतापाने बोलली.. मल्हार ताडकन् उठला.

"खोटं?... खरं ऐकायचंय्?"

"हो.."

"ऐकशील?"

"सांगा... असा कोणता कडा कोसळणार आहे?.." ती थंडपणाने म्हणाली...

"..त्याना सर्वांना कळलं.. सारं कळलं.. सारं घर... ती .. नुसते खवळून गेले.. आमच्या कल्पनांची हीच कदर केलीस तू?.. आमच्या नात्याना असा... असा गलीच्छ नकार दिलास तू! आमच्यातील तू आहेस.. आमचा तू आहेस... ही इतकी चटकन् विसरण्यासारखी गोष्ट वाटली तुला!... काही विचार.. काही अब्रू... काही विवेक...काही स्वत्व... सारे... सारे संस्कार... कुठे गेले.. कुठे गेले! ..."

एका श्वासात, जणु स्वतःशी मल्हार बोलला. खालची नजर तिने उचलली व थंडपणाने त्याच्या चेहऱ्यावर खिळविली.. मल्हार पुन्हा उसासला, "फार..फार यातना झाल्या त्यांना... ..त्यांच्या यातनांचं आंकडतांडव पाहून मी.. मुका.. झालो.. पांगळून गेलो.. छे.. हा आकांडतांडव.. हा भावनांचा .... गोधळ... हा गोंधळही कधीकधी असह्य होतो..."

मल्हार ओठ दाबून गप्प झाला. काही क्षण तसेच गेले... "तिनं तरी कमालच केली.. आमचं लग्न अजून झालं नाही.. तिचे वडील म्हणाले...मोडून टाक.. ते ऐकून ती.. तिनं कायमचाच आमच्याकडे मुक्काम ठोकला!.. आणि आमचे काका!.. जा! जा! ... त्याच्याजवळ जा पोरी! त्याला मार्गावर आण! ...हे असं!... आणि ती.. तिनं आपली विद्वत्ता पणाला लावली.. वेग न् गती यात फरक आहे...वेग?.. वेग ही कल्पनाच खोटी आहे.. सापेक्ष आहे! गती हीच सत्य आहे! .. तुला वेग सापडला नाही.. तुला काहीच सापडलं नाही... तुझी गती हरवली आहे.. ती कुठेही अशी नाही रे मिळणार.. माघारी ये!.. ती..तिला केवळ भावनांना झेलण्यासाठी दोन मोठे डोळे देवानं दिले आहेत.. दिवसातून अनेकदा... कसं ग हे पाहवेल?.. पुन्हा पुन्हा भरून यायची.. रडायची... पुन्हा कठोर व्हायची..पुन्हा..तिरस्कार करायची...पुन्हा मिठीत घ्यायची.. छे.. छे.."

मान हलवून मल्हार खाली उतरला..."या झडीने मला श्वासदेखील मिळेनासा झाला ग..."

मुक्ताचा चेहरा तिच्या नकळत वदलून गेला.. डोळे प्रेमाने, आश्चर्याने काठोकाठ भरून आले.. तिने मल्हारचा हात धरला व त्याला जवळ बसविले.

"...अशा घरातून तुम्ही इथे आलात.."

"तुमचंच चुकलं.."

"हं!..."

"पण त्यांना हे सारं कसं कळलं?..."

"कसं कळलं?.. कळलं झालं... मग... मी निघून गेलो.. व्या-प सांभाळला!.. आणि...आणि तिथे काकांसह ती आली!..बापरे!...केवढा आवेश...! प्रचंड मनं!... क्षमाशील वृत्ती!.... फार मोठी माणसं.. यांनी...यांनी हात पसरले तर आ–का–श यांच्याच मिटीत! ..."

"म्हणजे..."

"म्हणजे काय डोकं!.. बाटलेल्या... विटाळलेल्या ... चुकलेल्या मूर्खाचा उद्धार करण्यासाठी शुद्धीकरण समारंभ व्हावा तशी त्यांची भाषणं.. वागणं.. प्रेम करणं..."

दीर्घ श्वास घेऊन मल्हारने छाती दाबली. "छे.. काय.. कसली ही माणसं!.. पोकळ.. पोकळ.. नुसती पोकळ.. कंटाळा आला मला.."

(–तुझी वाट शोधण्यास इतक्या व्यथांची गरज नव्हती.. तू एकदा स्पर्श केलास.. तेव्हापासून हे जीवन एक वाहती व्यथा झालं आहे.. यात साऱ्या बाह्य यातनांची कशाला भर टाकते आहेस?...








मल्हारने मान हलवली नि असह्य होऊन तिच्या खांद्यावर टेकवली.. काही क्षण ती हलली नाही.. मग जागी झाल्यासारखी तिने मान वळवली.. आणि किंचित् थोपटून त्याचे डोके तिने खांद्यावरून दूर केले..

"संध्याकाळी मळचावरून शेवटी परत आलो...आणि आता इथे आलो.." थकून मल्हार पलंगावर पडताना म्हणाला.. बराच वेळ जड शांततेत गेला..

...बाहेरच्या खोलीतून तिच्या माणसाचा आवाज आला.. "मुक्ताबाई.."

"काय रे.."

"साहेबांचं सामान वर घेऊ? रस्त्यावर आता कोणीच नाही."

"सामान?" तिने विचारले आणि घाईने उठून मल्हार पुढे गेला—

"खरंच... विसरलोच.. वर आण.. ठेवून दे.."

* *

तिचा माणूस सामान वर आणायला निघून गेला. ती आश्चर्याने पाहात नुसती उभी होती.. मल्हार म्हणाला, "मी इथेच राहणार.."

...ती काहीच बोलली नाही.... खाली पाहात ती पलंगावर बसली.

"कां...बोलत नाहीस?..."

"..."

"का ग?.." मल्हारने आश्चर्याने तिच्याकडे पाहिले..तिने मान वळवली...आणि...दचकून मल्हारने तिचे खांदे धरले.. तिला उभी करून, त्याने तिला गदगदा हलविले.. आणि तो ओरडला, "ए... काय... बोल ना.."

आणि तिने त्याच्याकडे वर पाहिले... पाहता पाहता तिचे डोळे भरून आले.. कसेतरी ती म्हणाली, "सोडा मला..." त्याचे हात तिच्या खांद्यावरून धक्क्याने घसरले.. दूर होत ती हळूहळू बोलली.. "तुम्ही झोपा.. काही—तरीच विचार करू नका.."

आणि हे ऐकून मल्हारने लांबसा सुस्कारा सोडला. कसलीही वाट न पाहता तो क्षणात पलंगावर झोपी गेला!...

काही वेळाने तिने वळून पाहिले. त्याच्याजवळ ती गेली..

"तुम्ही इथे राहणार?.." स्वतःशीच ती बोलली.. अत्यंत गोंधळलेले तिचे शरीर पुढे सरकले.. आणि तिच्या ओठांचा स्पर्श न् डोळचात उरलेला थेंब त्याच्या चेहऱ्यावर एकदमच झेपावले..पण दचकून ती बाजूला झाली..मच्छरदाणी नीट करून तिने मोठा दिवा बंद केला आणि ती तिथून निघून गेली...

* *

पुढील आठ दहा दिवस गरगरा फिरत गेले... त्यांचा वेग मल्हारलाही शेवटी शेवटी भोवंडून टाकणारा वाटू लागला. हा वेग, त्याची दिशा, मल्हारला काहीच समजेनासे झाले..

त्या दिवशी सकाळी तो जागा झाला व स्वच्छ होऊन बाथ-रूमच्या बाहेर आला...दृश्य नेहमीचेच होते.. आणि नव्हते.. साफसफाईची तीच घाईगर्दी व पहाट-प्रहराची जागी होणारी तीच झिलई..पण..

तितक्यात तिच्या माणसाने विचारले,

"सरकार.. चहा आणू?"

मल्हार थांबला.. "कां आजही बाई उठली नाही अजून?..."

आणि याचे उत्तर म्हणून घरातील काम करणारी माणसं गोंधळली.. चुप बसली.. आपआपल्या कामाला पुन्हा लागली..

मल्हार टेबलापाशी बसला. चहाचे साहित्य पुढे आल्यावर त्याने सावकाश चहा तयार केला आणि साखर मिसळत तो तिच्या माणसाला म्हणाला—

"मुक्ताला उठव.."

माणूस बोलला नाही.

जरा करडचा नजरेने मल्हारने वर पाहिले.

"ऐकलं?..."

"हां जी.. पण बाई लवकर उठणार नाहीत.."

"कां?"

"काल उशीर झाला.."

आणि मल्हारने अस्वस्थ हुंकार दिला. त्याने चहा संपवून टाकला.

"काय रे.. खाली आजकाल दुसरी गाडी कोणाची उभी असते?"

"तुम्हाला माहीत नाही?.. सेठजीनी परवा—परवाच तर दिली बाईला.."

"अस्सं... बाई काल रात्री केव्हा आली?"

"तीन—चार वाजले असतील."







त्याच्याकडे एकदा पाहून मल्हार उठला व तडक तिच्या खोलीत घुसला. आत जाताच त्याने दार आतून बंद केले.

खोलीत मोठा दिवा अजून पेटलेलाच होता. . रेशीम-पडद्याच्या आड पलंगावर ती अस्ताव्यस्त पडली होती. . केसांना मस्तकाचे भान नाही! . . छातीला आवरणाचे भान नाही ! . . हाताना धडाचे भान नाही. तिच्या हाताशीच रिकामा प्याला कलंडून पडला होता व त्याच्या जवळ थोडा लालसर ओघळ सुकून संपला होता. पायाच्या आंगठ्याला अडकलेली तिची शाल खुशाल खाली लोंबत-लोळत होती. . बाजूला तंबोरा खाली पाहात पडला होता.

सकाळचे साडेसात झाले. . या खोलीची अजून रात्रीची गुंगी उतरलीच नाही! . . मल्हार विचित्र खिन्नतेने भरून गेला. . व दुसऱ्याच क्षणी तरातरा तिच्या पलंगाजवळ तो गेला. त्याने प्याला उचलला. . . व स्टुलावर टाकला. . तिला हलवून तो जागे करू लागला. . . . "मुक्ता!" तिचे डोके दोन्ही हातात धरून जेव्हा फार जोराने हलविले तेव्हा तिने थोडे डोळे उघडले. . "अं. . ."

"मुक्ता. . .! उठ. . काय हे! . ."

ती किंचित् वळली. . तिने हाताने केस मागे केले. . . व एकवार लाल कोऱ्या डोळ्यानी त्याच्याकडे पाहिले. . तिची ही अवस्था पाहून मल्हार खिन्नपणे उठला.

"इतकी जागरणं. . इतकं पिणं. . . ऊठ लवकर. . . "

"हूं. . " ती उठून बसली. . चार क्षण तिला काहीच समजले नाही. मग जांभई झाकीत ती बोलली, "तुम्ही जा. . मी आत्ता येते. . चहा झाला ?"

आणि त्याने निराशेने हुंकार दिला. .

बऱ्याच वेळाने ती पुढच्या बैठकीत आली. . मल्हार गॅलरीत एका खुर्चीवर रेलला होता. . तिने तिथे चहा आणला – "पुन्हा घ्या ना. ." मल्हारने कप हाती घेतला. . व तो पण आत आला. . कोचावर बसून त्याने एक घोट घेतला.

. . ती न्हाऊन आली होती. . पुन्हा ताजी. . पुन्हा नवी. . पुन्हा प्रसन्न! . . तिचे लक्ष कुठेच नव्हते. ती शांतपणे स्वतःचा चहा तयार करीत होती. ट्रे बाजूला करून तिने कप उचलला. . आणि तिचे लक्ष मल्हारकडे गेले. .

"हे काय ? . . . तुम्ही थांबलात ?" थोड्या आश्चर्याने तिने विचारले. आणि मल्हारकडे त्याच कोऱ्या नजरेने पाहता पाहता ती बदलली. . बरेच दिवसांनी. . तशीच गमतीदार हसली! आणि मल्हारने डोळे गच्च मिटून घेतले. . ओठ दाबून घेतले. . . आणि थरथरत तो म्हणाला "नको . . . नको. . . " तिचे हसू मावळले. . स्वतःचा कप तिने खाली ठेवला. आणि चटकन् त्याच्या कापऱ्या हातातून त्याचाही कप काढून घेतला.

डोळे न उघडता त्याने कसे तरी विचारले. . "मी इथे. . " पण तो बोलू शकला नाही. बराच वेळ थांबून तो म्हणाला, "हे काय चालवले आहेस तू ? "

"कुठं काय ? "

"काल रात्री केव्हा आलीस ? "

"थोडा उशीरच झाला. ."

"दारू किती पितेस ! "

आणि यावर विचित्र शिष्टपणाने हसून ती म्हणाली, "पण मला त्रास होत नाही. ."

"मला इथे येऊन पंधरा दिवस झालेत."

"हं. . "

"तू माझ्याजवळ मोकळेपणानं एकदाही . . एकदाही बसली नाहीस! . . "

"हूं! . . तुमच्याच तर जवळ आहे! "

" . . मी इथे राहात नव्हतो, तेव्हा रोज रात्री साडेअकरा-बाराला मला एकटचाला भेटायचीस. . आता रोज रात्री निघून जातेस! . . काही निमित्त सांगतेस. . लवकर येत नाहीस. तुझा रियाजही तुला नकोसा झालाय! . . . तुझे सेठ. . . तुझे चाहते. . तुझ्या गाण्याच्या बैठकी. . मैफली. . तुझे छंद. . आणि हे भरमसाठ पिणं. . काय चालवलं आहेस ? . ."

"हूं! " तिने हळूच मान दुसरीकडे वळवली. .

"मी इथे आहे. . तुला माहीत आहे ना ? . . "

"म्हणजे ? "

आणि रुक्ष स्वरात मल्हार बोलून गेला. . . "मी पैसे कमी देतो?"

आणि हे ऐकताच ती ताडकन् उठली.

"पुरे! . . . पैसे देताहात. . . . भरपूर देता. . पण मी पैशासाठी तुम्हाला इथे रहा म्हणून कधी म्हणाले का ? . . . "

"नाही . . नाही. . . तू काहीच म्हणाली नाहीस. . मीच इथे आलो. . . ती. . . ती तरी कुठे काय म्हणाली ? . . मीच तिला जीव लावला म्हणे. . त्या जगातून मला कोणी हाकललं? . . मीच. . इथे आलो. . . खरं आहे. ."

"तसं नाही. . पण. . . पण. . तुम्हाला काय हवंय् ? "

आणि यावर मल्हार खिन्न हसला. "कशी गंमत आहे! इथे सुद्धा तेच. . काय हवंय् ते समजत नाही. . आणि चटकन् सांगणं जमत नाही. . ."

यावर ती काहीच बोलली नाही. . मानेला हिसका देऊन तिने केस सावरले. . आणि ती आत गेली. . . थंड होणाऱ्या चहावरील थरकापणाऱ्या ललसर साईकडे बघत मल्हार बसून राहिला. . .

(–साऱ्या भयानकतेला, समोर जाऊन जवळ घेण्याचे गांभीर्य दे ! दंभाचे खरे स्वरूप पाहण्यास डोळे दोन दे ! )

अनुक्रमणिका

माझे आज जे आहे, ते हरपले, गळाले, तरी देणारा हात मागे घेऊ नकोस.. तुला जर विचित्र रूपात नटवून बघत असेन तर.. माझे डोळे.. हरकत नाही... फुटून जाऊ देत!

खरे रूप कळू दे ! ते कसेही असो.. ते कसेही नसो –)

* *

तास निघून गेले.

ती बाहेर आली.

मल्हार बसून होता.

थंड चहा समोर पडला होता.

न राहवून, आवेगाने ती पळत त्याच्या जवळ गेली... आणि त्याला आपल्याकडे वळवून म्हणाली, "हे तुमचं तरी काय?..अशानं कसं चालणार!..इथं कसं चालणार?..काय चालू आहे हे? थांबवा.. हे थांबवा!.."

सुन्नपणे मल्हारने तिच्याकडे पाहिले.. हसण्याचा व्यर्थ प्रयत्न करीत म्हणाला, "तुला.." पण तिच्याकडे नीट पाहताच त्याने शब्द गिळले...

(– सांग म्हणालीस.. सांगायला बसलो..असा पोचलो. शब्दांची जागा.. नुसत्या अनर्थाने घेतली.

आणि तू निघून गेलीस ना?.. फार.. फार लाज वाटली ....पुन्हा तुझे शब्द!..शब्द..शब्द!

शब्दही नाण्यांसारखे वाजवीन!

तुझा व्यवहार!

घे! कुणाची तरी किंमत..!–)

तिच्याकडे पाहून तो काही वेळाने बोलला, "हे काय! तू बाहेर चालली आहेस? ..आज सकाळीच?.. रात्री.. दिवसा.. सकाळी.. सतत .. बाहेर.."

त्याच्या खांद्यावरचे हात काढून ती गॅलरीत डोकावलेल्या उन्हाकडे पाहात म्हणाली, "हो.."

"तू जाऊ नकोस मुक्ता!"

"नाही.. मी शब्द दिला आहे."

"मला तुझ्याशी बोलायचं आहे..."

"..मला गेलं पाहिजे.."

आणि किंचित् हात वर करून तिने त्याचा निरोप घेतला!.. तिच्या नव्या गाडीचा रस आवाज दूर गेला!....

दूरवरून तरंगत पुसटसे.. तुटकसे..स्वर येत होते..

'भटकती लहर हूं.....
मैं किनारा नही हूं....'

* *

ती परत आली. भर दुपारच्या उन्हात.. अडीच–तीनचा प्रहर.. आत पाऊल टाकताच, लोडाला टेकून झोपलेला मल्हार तिला दिसला.. बाजूला कसले तरी पुस्तक पडले होते... दोन क्षण तिच्या पावलात शिसे साचले...पण एक क्षणच...

ती लगेच आत गेली.. पण पुन्हा बाहेर आली.. त्याच्या उशाचा लोड काढून तिने मऊ उशी तिथे ठेवली.. पुस्तक उचलले.. सहज पाहिले व नीट टेबलावर ठेवून दिले..आणि ती आत गेली...

* *

रात्रीचे दहा झाले..

मल्हार आज प्रथमच बाहेरून थोडा फिरून आला. पूर्वीप्रमाणे... जिन्यावरून चढताना अनेक विचारांच्या कल्लोळाने तो क्षणभर थबकला...

त्याचे पाऊल गॅलरीत पडताच, काचमण्यांच्या पडद्याशी खेळणाऱ्या मुक्ताकडे त्याचे लक्ष गेले.

"तू!"

"हं.."

"आज बाहेर गेली नाहीस! दहा वाजलेत.."

"...जाणार आहे!..तुम्ही आल्यावर जावं म्हटलं.."

क्षणभर तिच्या डोळ्यातून त्याने आरपार पाहिले... म्हणाला – "मी आलोय.. जा तू..." आणि तो आत गेला...

पण तितक्यात तिचा माणूस लगबगीने वर आला...

"काय रे?"

"मुक्ताबाई.. नवीन कोणीतरी आलं आहे.."

तिनं किंचित् नापसंती दाखवली.. मग म्हणाली, "पाठवून दे.."

थोड्या वेळाने गॅलरीत एक उंचापुरा म्हातारा आला.. केस पांढरे म्हणून म्हातारा.. एरवी ताठ!.. हातातील काठी न टेकवता त्याने दोन्ही हातांनी खेळवली.. आतून मुक्ताचा आवाज आला.. "आत या.."

तो आत गेला "बसा"...

चौफेर नजर टाकीत ते गृहस्थ बोलले "नाही.."

"कशाला आलात?.."

"इथे आणखी कोण आहे?"












त्यानी तिलाच कडक प्रश्न टाकला!

– आणि काकांचा आवाज ऐकून मल्हार घाईने बाहेर आला. . .

"काका ! . . . इथे! . . . ."

"म्हणजे . . तू इथेच आहेस! . ." आणि काका आता खुर्चीवर बसले.

. . मुक्ता मल्हारकडे टकमका बघू लागली. . . नंतर थोडी सावरल्यावर म्हणाली, " बसा . . मी चहा आणते . ."

तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे काका पहातच राहिले. . . ती गेल्यावर जागे झाल्यासारखे मल्हारकडे ते वळले. . . मल्हार खाली पहात शांत बसला होता. . कोणी काहीच बोलले नाही.

काठीवर ताल धरीत काकांचे चौफेर निरीक्षण फक्त चालू होते. चहाचा ट्रे तिने ठेवला. . आणि चहा तयार करून काकांच्या हाती तिने कप दिला. . सर्वांनी निमूटपणे चहा घेतला.

मग काठी खाली टेकवून काका शांतपणे म्हणाले, "आमचं माणूस तुम्ही इथे कां आणलं ? ". . .

स्वर शांत असला तरी शब्द वादळ निर्माण करतात कधी कधी! . . . या प्रश्नाने मुक्ता दरदरून उठली . .

"काय म्हणालात ? . ."

काका काही बोलले नाहीत. . .तीच थांबून म्हणाली, "तुमचं माणूस मी आणलं नाही."

"उत्तम! . . . .मग त्याला आमच्या स्वाधीन करा . . दहा-पंधरा दिवस तमाशा झाला . . तो वस्स झाला . . "

"मी त्याना तुमच्या स्वाधीन करणार ? "

"हो . . "

" . .ते माझे नाहीत . . आणि . . मी . . त्यांची नाही . . "

यावर काका थोडेसे चिडले. . . "बस्स कर बाई. . . सुंदर आहेस . . फार चलाख आहेस . . त्याला परत पाठव... मी नेणार आहे . . ."

"अहो . . मी त्यांना आणलं नाही . . कोंडलं नाही . . ते कुठंही जाऊ शकतात . . मी 'या' म्हटलं नाही . . ."

". . जा म्हण . . "

"नाही . . ते नको . . तुम्हाला कळत कसं नाही . . त्याना कुणी जा म्हणण्याची आवश्यकता नाही . . "

"त्याला आंधळा बनवू नकोस . . मोठा वतनदार अब्रूदार माणूस आहे तो . . कामाचा आहे . . त्याच्या कामात त्याला जाऊ दे . . . "

आश्चर्याने तिने हे ऐकले व ती मोकळी हसली. . . काका आता मात्र चांगलेच चिडले. "लाज वाटली पाहिजे तुला . . . दुसऱ्याचं आयुष्य नासवून टाकतेस ! . . . वस्स झालं त्याचं इथे राहणं . . ."

आणि प्रथमच मल्हारने मान वर केली. काकाकडे पाहात तो उठला व शांतपणाने म्हणाला– "मला घरी यायचं नाही. . . तुम्ही जा . ."

"काय? . . ." काका आणि मुक्ता दोघांचेही आश्चर्य त्यांच्या शब्दात मावत नव्हते.

आणि गंभीर होत मुक्ता अनपेक्षित ते बोलली, "तुम्ही . . जा . . . या घरात थांबू नका . . . "तुम्ही यांच्या बरोबर जा . . ."

"ही . . ही तुझी इच्छा आहे ? "

"हो . . .हो . . . माझी इच्छा आहे . . जा . . मला तुम्ही नको आहात . . ." मल्हारकडे सरळ पाहात तिने सरळ सांगितले.

मल्हारला कुठे बघावे हेच समजेना . . खोलीभर त्याची नजर भिरभिर फिरली . . आणि पुढच्याच क्षणी तो गर्रकन् आत वळला.

काही वेळाने हाती सूटकेस घेऊन तो बाहेर आला. . . आनंदाने क्षणभर हलून काका त्याच्याजवळ धावले. . . त्याच्या पाठीवर हात टाकून म्हणाले – "चल पोरा . . . शाबास ! . . . ."

"नाही काका . . . तसं नाही . . .मी बाहेर पडतोय् . . . पण त्या घरी नाही . . . येणार नाही . . ."

"नाही ? . . ."

"कधी नाही . . . कधी नाही . . . जे रंग उडाले ते पुन्हा फासत वसण्याची मला इच्छा नाही . . . जा तुम्ही . . ."

हे ऐकून मुक्ताचा कठोर झालेला चेहरा पाहता पाहता वितळू लागला . . . "तुम्ही घरी जाणार नाही ? . . . ."

" . . . . "

"तुम्ही इथून निघून जाणार ?"

" . . . . "

"पण तुम्ही कुठे जाताहात ? . . ."

"बाहेर . . . . बाहेर . . . . हं ! . . . . एक भटकती लहर न् किनारा ! . . . एकदा तरी समजून घेत जा . . . ."

आणि मुक्ता झर्रकन् पुढे झाली . . . "आणा इकडे . . ." त्याची सूटकेस हिसकून तिने बाजूला टाकली. आणि काकाना निग्रहाने म्हणाली-"ते येणार नाहीत... मी त्यांना पाठवणार नाही . ."

"तू इथे राहणार आहेस मल्हार ? . . ."

"नाही . . . मी इथे थांबणार नाही . . . पण मी घरी देखील येणार नाही . . ." आणि त्याचा हात धरून मुक्ता कळवळून बोलली, "असं करू नका . . . मी . . . हे बघा . . . मी आजवर कुणाची कधी क्षमा मागितली नाही . . . असं करू नका . . . क्षमा . . . क्षमा . . करा . . पण आज जाऊ नका. मी जाऊ देणार नाही, . . मुळीच नाही . . ."

अनुक्रमणिका






आणि मल्हार थकून गळून, गोंधळून कोचावर पडला... तसे काका उठले. "ठीक आहे... मी बरेच मृत्यु पाहिले आहेत पोरा... माझी काळजी करू नको..." आणि जाताना थोडे थांबून म्हणाले– "...घर तुझं आहे... लक्षात ठेव..."

* *

काका निघून गेले. काही वेळाने मुक्ता मल्हारजवळ गेली.. म्हणाली–

"उठा आता.."

मल्हार हळूच उठला–आणि तिच्या जवळ उभा राहिला.. दोन्ही तळव्यात तिचा चेहरा त्याने घेतला.. व पाहू लागला.. किंचित् हसून ती म्हणाली–"अंऽहं !.. असं नाही... असं..!" आणि तिने स्वतःच आपला चेहरा थोडा वर उचलला !.. पण मल्हार हसला नाही.

"मी फार.. थकलोय्.."

"चला.. काही खाऊन झोपा.."

"मला.. आज.."

"काय ?"

"काही नाही... आत चल.."

तिच्या मधल्या खोलीत तो आला. आणि हळूहळू त्या कपाटा-कडे गेला.... क्षणभर थबकून त्याने झटक्याने कपाट उघडले. आणि लालसर बाटली काढून प्याल्यात ओतली...

क्षणात त्याने प्याला रिकामा केला...

ती चटकन् उठली आणि त्याच्या हातातील बाटली तिने हिस-कून घेतली.. घशावर हात ठेवून तो म्हणाला, "मला आणखी हवीय्.."

निर्विकारपणे त्याच्याकडे पाहात तिने थोडा विचार केला व त्याचा प्याला भरून दिला. प्याला रिकामा करून तो म्हणाला–

"आता..आता जा !..तुझे ते..चाहते..."

"मल्हार !.." आणि रडवेली होऊन तिने त्याला आवेगाने मिठी मारली... "तू जाऊ नकोस !... तू जाऊ नकोस !..." आणि त्याच्या छातीवर आपले जणू सर्वस्व रेलून, घासून ती क्षणात कण्हली.. रडली.. कांपली.. वाहून.. वाहून जाऊ लागली !...

मल्हारने तिला कुरवाळले... "मुक्ता !... नाही.. जाणार नाही..पण..तुलाच..तू जातेस ना ?.."

आणि त्याच्या छातीवर अनावर होऊन तिने डोके घासले–

"नको रे !.. नाही.. नाही.. मी जात नाही.. मी जात नाही.."

"मुक्ता !.." आणि मल्हारने तिला आपल्या गच्च मिठीत कवटाळून घेतले..

"तू.. तू..."

पण त्याच्या मिठीत.. चुंबनांच्या वर्षावात.. ती अक्षरशः दबून गेली.. भरून गेली.. काही बोललीच नाही...

(–जेव्हा ढगाला आवरले नाही तेव्हाच तो झरला ग !

वाऱ्याने खूप ढकलले म्हणूनच तो इथे आला ग !

तुझा त्रागा !... नको ! एकदा चुकून स्पर्श झाला... त्यांचे सोने होते... माझे मात्र रूपच मला सोडून गेलेय् ग !–)

रात्रीचे अकरा-साडे अकरा...मल्हारचा वर्षाव किंचित कमी होताच तिने त्याच्याकडे पाहिले.. आणि तसेच खटयाळ गमतीदार ती हसली ! म्हणाली, "आज तीन महिन्यांपेक्षा जास्त दिवस झालेत.. पण.. इतकी वाट वघावी लागली !... ए ! आम्ही स्पर्श तसा करीत नाही.. क्षण.. क्षण.. निवडून घेतो !.. हं ! .. सापडला तसा क्षण ?..."

आणि मल्हार प्रसन्न हसून उत्तरला.. "हो !..."

* *

दोन प्रचंड प्रवाह परस्परावर धावून आल्यानंतर काही क्षण गोल गिरक्या घेत राहतात.. तसे काही दिवस निघून गेले.. पण..

पण प्रवाहाना वेग असतो.. दिशा असतात.. पुन्हा प्रवा-हांच्या शाखा फाकू लागतात...

आजकाल मल्हार क्वचितच तिच्या घरी थांबायचा.. एकदा तिचा माणूस म्हणाला..

"बाई..साहेब..."

"सांग..."

"साहेब वस्तीत दुसरीकडे जातात.."

"चूप्प !.." कडाडून मुक्ता उभी राहिली.. पण अकस्मात् ओघळून आत निघून गेली..

तिने एक दोनदा मल्हारला विचारले.. उत्तर म्हणून तो काहीतरी बडबडायचा....

"वस्त्र न् पांघरुणं यांचा मला फार कंटाळा आलाय्... तिथे ते.. इथे ?....

"ज्याच्या भरवशावर आमचं जीवन उभं राहतं.. त्या पाव-लाना.. कधी मेंदी लावतो.. कधी लक्तरानी नासवतो.. ही पावलं तशाच नागव्या स्वच्छ रूपात कोणी ठेवीत नाही !.. आणि टेकायला इथे जागाच कुठंय् ?...

"मी वचन दिलं होत.. वादळ ओसरताच मी येईन !.. वादळ ओसरून गेलंय्.. आणि मी एकाच ढगासारखा असा मागे घटमळतोय् ?....

एकदा तूच बांधलेली ही खोली ..
एकदा तूच टाकलेले हे पोलाद
एकदा तूच दिलेला हा काळोख ..
एकदा तूच दिलेला हा किनारा ...

(पृष्ठ ५८ वर पहा)







अनुक्रमणिका

# दोन किंवा तीन मुले पुरेत



**कुटुंब नियोजन केंद्राची खूण लाल त्रिकोण**

davp 68/276





अनुक्रमणिका

# कुटुंबनियोजन कार्यक्रमाचा अन्वयार्थ

— श्री. गोविंद नारायण

( सचिव, आरोग्य–कुटुंबनियोजन–नागरी विकास मंत्रालय )



'सर्व प्रश्नांस कारणीभूत होणारा प्रश्न,' कूट प्रश्न व महाअरिष्ट बनू पाहणारा प्रश्न अशा प्रकारचे वर्णन भारताच्या लोकसंख्येच्या प्रश्नाचे केले जाते. लोकसंख्यावाढ म्हणजे प्रगतीची पिछेहाट व अधिक समस्या असे आपल्या पंतप्रधानानी म्हटले आहे. जर हा प्रश्न आम्ही सोडवू शकलो, तर नियोजन यशस्वी होईल व राष्ट्र म्हणून आपले भवितव्य निश्चितपणे उज्ज्वल होईल एवढे सांगितले तरी पुरे.

आज या देशाची लोकसंख्या भूमिती श्रेणीने वाढत आहे. राष्ट्राची साधन-संपत्ती लोकसंख्येच्या प्रमाणात वाढली नाही तर साधन संपत्तीची कमतरता जाणवू लागेल. भारताच्या कुटुंब नियोजन कार्यक्रमाचा विचार केवळ देशातील उपलब्ध व संभाव्य साधन संपत्तीच्या दृष्टिकोनातून करता येणार नाही तर सामाजिक, सांस्कृतिक, प्रशासकीय व जनसंपर्काच्या संदर्भात त्याचा विचार करावा लागेल.

सामाजिक व सांस्कृतिक दृष्टिकोनातून कुटुंब नियोजन कार्यक्रमाकडे पाहिले तर हा कार्यक्रम लोकांच्या वृत्तीत व प्रवृत्तीत अटळपणे बदल घडवून आणील. व्यक्तीच्या खाजगी वर्तणुकीशी संबंधित असलेला हा बदल जाणीवपूर्वक करण्यात येत असल्याने त्यास थोडासा विरोध होण्याची शक्यता आहे.

'छोटे कुटुंब' शक्य व व्यवहार्य आहे अशा तऱ्हेचा सामाजिक संकेत कुटुंब नियोजन कार्यक्रमामुळे रूढ होईल हा या कार्यक्रमाचा साकल्याने होणारा सामाजिक व सांस्कृतिक परिणाम होय. याशिवाय आपल्या इतिहासात प्रथमच व्यक्तिमात्राच्या खाजगी वर्तनावर खुली चर्चा होण्यास प्रारंभ झाला आहे. तसेच व्यक्तिगत कृत्यांच्या सामाजिक परिणामांची जाणीव लोकाना होऊ लागली आहे.

**व्यापक कार्यक्रम**

आरोग्य व समाजकल्याण क्षेत्रात व्यापक स्वरूपाचे कार्यक्रम आखणे केवळ इष्टच नव्हे तर ते व्यवहार्यही आहे ही गोष्ट आपल्या कुटुंब नियोजन कार्यक्रमामुळे निदर्शनास आली आहे.

आजारी व्यक्तीने उपचारासाठी शोधाशोध करावी अशी आजवरची वैद्यकीय प्रथा होती हे लक्षात घेतले तर या कार्यक्रमाचे महत्त्व लक्षात येईल. तथापि सार्वजनिक व फिरत्या आरोग्य प्रकल्पांच्या निर्मितीमुळे उपचारासाठी, वैद्यकीय उपचाराची सोय असलेल्या जागी जाण्याऐवजी ती सोय आज लोकाना घरबसल्या उपलब्ध होऊ शकते. एक सामाजिक गरज व जबाबदारी म्हणून हे कार्य केले जाते.

अशा प्रकारे वैद्यकीय व सार्वजनिक आरोग्य सेवा यांच्या याबाबतची तात्त्विक प्रणाली व प्रत्यक्ष व्यवहार यात मोठे परिवर्तन घडविले जात आहे.

**सुयोग्य यंत्रणा**

या व्यापक कार्यक्रमासाठी योजलेली यंत्रणा आपली जबाबदारी माणुसकी व सामंजस्य यांस अनुसरून पार पाडील अशा तऱ्हेने सिद्ध करणे हेही आवश्यक होते. लोकांशी चांगल्या तऱ्हेने संपर्क साधून जरूर ते शिक्षण व प्रेरणा देणारी व सर्व पातळीवर सुयोग्य ठरणारी यंत्रणा असणे जरूर आहे.

**सांघिक कार्य**

अनेक व्यक्तींशी, त्यांच्या वृत्ती व वर्तनाशी संबंध येणाऱ्या, कार्यक्रमात आपणास विविध प्रकारच्या कार्यकर्त्यांची आवश्यकता असते. वैद्यकीय व निम–वैद्यकीय कर्मचाऱ्यांशिवाय, लोकांची संस्कृती, मूल्ये व श्रद्धा लक्षात घेऊन वैद्यकीय ज्ञानाचा वापर करता येण्याच्या दृष्टीने समाज शास्त्रज्ञांचीही जरूरी असते. अशा प्रकारे डॉक्टर व समाजशास्त्रज्ञ याना एकत्रपणे कार्य करावे लागेल. आपल्या देशाच्या सामाजिक जीवनात तरी या सांघिक भावनेने काम करणे हा या कार्यक्रमामुळे आलेला नवीन विचार आहे.

**दुर्गम विभागांशी संपर्क**

आपल्या देशाच्या लोकसंख्येपैकी फक्त २० टक्के लोकसंख्येपर्यंतच आपल्या जनसंपक माध्यमांद्वारे संपर्क साधला जातो हे





अनुक्रमणिका

सर्वश्रुतच आहे. देशाच्या सर्व भागात अद्याप रस्ते व रेल्वे मार्ग यांचे जाळे पसरलेले नाही व काही भाग अद्यापही दुर्गमच आहे. देशातील अशा प्रकारच्या अगदी आडवळणाच्या व दुर्गम भागातील लोकांपर्यंतही संपर्क साधण्याच्या दृष्टीने कुटुंब नियोजन कार्यक्रमाद्वारे प्रयत्न होत राहतील. म्हणजेच देशातील सुमारे ६ लाख खेडी व ३ हजार शहरे व गावे या कार्यक्रमाखाली आणली जात आहेत. हे साध्य होण्याच्या दृष्टीने कुटुंब नियोजन कार्यक्रमात काही उपक्रम योजावे लागले आहेत. लोक-कला व लोक-संगीत यांच्या सर्व अंगाचा उपयोग कुटुंब नियोजनाचा संदेश जनतेपर्यंत पोहोचविण्याच्या दृष्टीने करण्याचा प्रयत्न प्रथमच या कार्यक्रमात केला जात आहे. यामुळे सबंध देशातील गवैये, संगीतज्ञ, वाहुल्यांचा खेळ करून दाखविणारे कलाकार, नाटककार यांच्या कलेस चालना मिळाली आहे. लोकांना परिचित व मान्य असलेल्या माध्यमाद्वारे कुटुंब नियोजनाचा संदेश त्यांच्यापर्यंत पोहोचविण्याचा प्रयत्न चालू आहे. अशा तऱ्हेने या कुटुंब नियोजन कार्यक्रमामुळे या कलाना सरकारी आश्रय पुन्हा लाभत आहे. साहजिकच कलेच्या विकासाला चांगला हातभार लागल्याचे दिसून येईल.

**आर्थिक फायदे**

आरोग्य व समाज कल्याण कार्यक्रमाअंती निष्पन्न होणाऱ्या आर्थिक फायद्यासंबंधी प्रशासकाना व योजकाना काहीही माहिती उपलब्ध करून देण्याची दिसून आलेली असमर्थता हे आपल्या देशातील या कार्यक्रमाच्या उणीवेचे मूळ कारण होय. विविध पातळीवरील लक्ष्य ठराविक कालमर्यादेत केवळ साध्य करण्याचाच नव्हे तर कर्मचारी व त्यांच्या मालक संघटना या दोघाना किती आर्थिक फायदा होतो आहे हे शोधण्यासाठी सुसंघटित गटाना अभ्यास कार्य हाती घेण्याच्या दृष्टीने या कार्यक्रमाद्वारे प्रयत्न चालू आहे. हे साधल्यास या क्षेत्रात आपण इतिहास घडविल्याचे श्रेय लाभेल.

**सावधानतेचा इशारा**

कुटुंब नियोजन कार्यक्रम हा या देशातील सर्वात महत्त्वाकांक्षी कार्यक्रम आहे. कारण त्यामुळे राहणीमान वाढेल अशी आशा आहे. लोकास साधन संपत्तीची यथाप्रमाण वाटणी व्हावी याची हमी देऊन आपली औद्योगिक व शेतकी प्रगतीचा वेग वाढविणे हा या कार्यक्रमाचा उद्देश असला तरी हे उद्दिष्ट आपणास लगेच साध्य करता येणार नाही असा सावधानतेचा इशारा मला द्यावासा वाटतो. जनतेशी, मानवी वृत्तीशी व वर्तनाशी संबंधित असलेले कार्यक्रम हे कांही जादुसारखे पट्दिशी अमलात आणता येत नाहीत. त्यांचे परिणाम अनेक वर्षानंतर दिसून येतात. सर्व उपलब्ध साधने व कर्मचारी यांचे आपण साहाय्य घेऊ शकलो तरीही सध्याचे जननप्रमाण निम्म्याइतके खाली आणण्याचे उद्दिष्ट एका दशकाच्या कालावधीत गाठता यावयाचे नाही. मात्र ठराविक अंतराने या कार्यक्रमाचा परिणाम काय होत आहे ते पाहण्यासाठी काही साधन ठरविले पाहिजे.

**विचारवंताना आव्हान**

कुटुंब नियोजन कार्यक्रम म्हणजे देशातील सर्व विचारवंताना एक आव्हान आहे. हा कार्यक्रम यशस्वी झाल्यास समृद्ध व प्रगत राष्ट्र म्हणून मानाने जगता येईल. मात्र त्यास अपयश आल्यास आपणास सतत आपत्तीना तोंड द्यावे लागेल. या कार्यक्रमात सहभागी होणारे कर्मचारी व आपल्या सर्वांची सद्सद्विवेक बुद्धी यावर माझा विश्वास आहे. तसेच राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने या कार्यक्रमामुळे अनेक प्रकारचे सुपरिणाम दिसून येणार असल्यामुळे आम्ही तो यशस्वी करू शकू अशी मला खात्री वाटते.

☆ ☆

---

(पृष्ठ ४१ वरून . . . **विराग**)

" सारे पाश जोडून पाहिले . . सारे पाश तोडून पाहिले . . काही जुळत नाही . . कुठे साधी कळ नाही ! . . . .

" मी इथे आलो . . ही हवा . . ज्यात सोंग टिकत नाही . . हिचा भडका टोपाना उडवून देतो . . ही हवा . . हा प्रकाश . . ही मस्ती . . ह्या वासना . . वासना सांगणं . . मागणं . . देणं . . . सारा सरळ प्रकार . . एक सरळ वाट . . इथून तरी सरळ वाट आहे ? . . .

—त्याचे हे बोलणे ऐकून, तिने त्याला काहीही विचारणे सोडून दिले.

. . . अनेक दिवसानी, आज ती पण संध्याकाळी बाहेर उडून गेली ! . . .

रात्र . . अकरा–साडेअकरा ! . .

तिच्या तंबोऱ्याकडे पाहात मल्हार एकटाच कोचावर बसून होता . . बाजूला त्याची सूटकेस . . .

. . जिन्यावर तिची पावलं . . . गॅलरीने मान खाली घातली ! . . . काचमण्याना बाजूला करून मुक्ता आत आली . . व त्याला तसे पाहून तशीच उभी राहिली . . .

काही वेळाने मल्हार बोलला . . "मी . . जातो . . ." ती बोलली नाही. त्याच्यावरची दृष्टीही हलली नाही . . एकदा मान वर करून त्याने तिच्याकडे पाहिले . . आणि सूटकेस उचलून तो निघाला ! . . . ती हलली नाही . . श्वास नाही . . शब्द नाही . . हालचाल नाही . . काही नाही ! . . .

खाली जाऊन मल्हारने गाडीचे दार उघडले. . . सूटकेस मागे फेकली आणि पुढच्या काचेतून पाहात त्याने गाडीचे दिवे व यंत्र खटक्याने सुरू केले . . . काचेतून दूर गेलेली नजर गाठायला मल्हारची गाडी निघून गेली ! . . . .

गाडी निघून गेली . . मुक्ता अजून त्याच अवस्थेत उभी होती . . मागे वळून तिने काचमण्यांचा पडदा दूर केला . . अंधाऱ्या गॅलरीत ती उभी राहिली . . .

दूर . . आकाशाच्या त्या तुकड्यात खूपच चांदण्या एकवटल्या होत्या . . त्या एवढ्याशा तुकड्यातील चांदण्यांची गर्दी पाहून मुक्ता स्तब्ध झाली ! . . . नकळत तिचे डोळे मिटले . . . आणि मान मागे दाराच्या चौकटीवर टेकली . . . .

– लवलवती ज्वाळा होऊन या रात्रीतून आता निघून जा !
सारी संगत आता पुरे झाली !
या चंद्राच्या ऐटीत मिरविणाऱ्या रात्रीची साथ सोडून जा !
या उसन्या प्रकाशाला फाडून जा !
एकदा ओठ फोडून ह्याना 'नाही !' म्हणून सांगून जा !

● ● ●






कुटुंब नियोजन

# मिळविलेले यश व पुढील कार्य

—दपिक भाटीया



**समाजकल्याण** कार्याच्या इतिहासात भारताच्या कुटुंब नियोजन कार्यक्रमाचे स्थान अभूतपूर्व आहे. सामाजिक बदलास चालना देण्याच्या तसेच वैद्यकीय व सार्वजनिक आरोग्य सेवांच्या कार्यास नवा आशय व नवी दिशा देण्याच्या दृष्टीने या कार्यक्रमाने विशिष्ट कामगिरी केली आहे.

सध्याच्या परिस्थितीचे मूल्यमापन करणे, गरजा, साधन संपत्ती, उद्दिष्टचे, अंमलवजावणीची कालमर्यादा व विविध लक्ष्ये यांची निश्चिती करणे या गोष्टी नियोजनाच्या दृष्टीने मूलभूत महत्त्वाच्या आहेत हे नियोजकाना चांगल्या प्रकारे माहिती आहे.

दहा कोटी जोडप्यांना अर्थात् २० कोटी व्यक्तीना म्हणजेच अमेरिकेच्या लोकसंख्येइतक्या व्यक्तींना सामावून घेऊ शकेल असा आमचा कुटुंब नियोजन कार्यक्रम असला पाहिजे. देशातील ३,००० शहरात व ५,६०,००० खेड्यात उद्दिष्टांची गटवारी वाटणी, ८० टक्के लोकसंख्येपर्यंत जनसंपर्क साधनाद्वारे न करता येणारा प्रचार, जलद व आधुनिक वाहनांचा अभाव, अल्प साक्षरता व भिन्नभिन्न चालीरिती, परंपरा व भाषा इत्यादीमुळे कार्यक्रमाच्या अंमलबजावणीचे कार्य गुंतागुंतीचे झाले आहे. या मर्यादा लक्षात घेऊनच अंमलवजावणीच्या यंत्रणेचा विकास साधला पाहिजे.

### उल्लेखनीय यश

म्हणूनच एवढ्या मोठ्या प्रमाणावर कार्यक्रम आखून तो हाती घेणे हे साधेसुधे यश नव्हे. याकरिता जनतासंपर्क साधू शकणारी व लोकाना साधनांचा वापर करण्यास प्रवृत्त करणारी, निर्णय घेऊ शकणारी व त्वरित अंमलवजावणी करू शकणारी एक प्रशासनिक यंत्रणा विकसित करावी लागली. परिणामकारक निष्कर्ष गाठू शकण्याच्या दृष्टीने व लोकांचे सहकार्य मिळविण्याचे दृष्टीने सदर यंत्रणा विस्तृत पायावर व्यापक स्वरूपाची ठेवावी लागली.

लोकाभिमुख संस्थांचे सक्रीय सहकार्यही नियोजनाच्या टप्प्यात व अंमलबजावणीचे वेळी मिळणे ही महत्त्वाची गोष्ट होय. आज असे म्हणता येईल की कुटुंब नियोजन कार्यक्रम हा एखादा नोकरशाही यंत्रणेने आखलेला व कार्यान्वित केलेला कार्यक्रम नाही तर समाजाच्या गरजांविषयी जागृत असलेल्या, समाजासाठी योजना आखणाऱ्या व अंमलात आणणाऱ्या एका व्यापक यंत्रणेने तयार करून तो प्रत्यक्षात आणीत असलेला असा कार्यक्रम आहे.

या कार्यक्रमाचे दुसरे यश असे की, संतती नियमनाचे शिक्षण व या उपक्रमास चालना देण्याचा एवढा व्यापक व पद्धतशीर प्रयत्न पूर्वी कधी झाला नव्हता. कृषि व उद्योग क्षेत्रात मोठ्या मोहिमा हाती घेण्यात आल्या, परंतु त्या उत्पादन वाढविण्यासाठी! तथापि आमचा हा कार्यक्रम व्यक्तीची वागणूक बदलण्याच्या व तिच्या खाजगी जीवनातील तिच्या प्रवृत्ती वदलण्याच्या प्रश्नाशी निगडीत आहे. या गोष्टीमुळे हा कार्यक्रम वैशिष्टचपूर्ण ठरला आहे. या प्रचंड प्रयत्नामुळे भारतातील लोक कुटुंब नियोजन व शरीर-संबंध यावर आता मोकळेपणाने बोलू शकतात. पूर्वी असे कधी घडत नव्हते. या देशात सर्वच लोक कुटुंब-नियोजनाविषयी बोलताना दिसतात हा एक निश्चित बदल आहे. एखाद्याला किती अपत्ये असावी या विषयीहि ते लवकरच बोलू लागतील असे मला वाटते. सामाजिक वातावरणात जाणवण्याइतपत बदल झालाच आहे व छोट्या कुटुंबातही प्रत्येकाच्या मनात सामाजिक जाणीव निर्माण करण्याचे स्वप्नही लवकरच साकार होईल.

सामाजिक महत्त्वाच्या अशा प्रचंड कार्यक्रमात धोका पत्करता येत नाही. अनेक वर्षांच्या वापराने शास्त्रीय दृष्टचा उपयुक्त ठरलेल्या वैज्ञानिक पद्धतींचाच या कार्यक्रमात अंतर्भाव करणे शक्य ठरते. लोकांपुढे संतती प्रतिबंधक साधनांच्या पर्यायी पद्धती उदा. प्रतिबंधक शस्त्रक्रिया, लूप, निरोध व आता गोळ्या ठेवणे जरुरीचे होते. ४३ लक्ष संतती प्रतिबंधक शस्त्रक्रिया करण्यात आल्या असून २८ लक्ष लूप वसविण्यात आले आहेत. ३१२ प्रायोगिक प्रकल्पात गोळ्यांचा वापर त्यांच्या परिणामकारकता ठरविण्याच्या दृष्टीने केला जातो.

### पद्धतीची निवड

अशा रीतीने लोकांपुढे पर्याय ठेवण्यात येत असल्याने त्यांच्या

( पृष्ठ ५० वर )

[ पान १० वरून – शेंदऱ्या आंबा ]
राह्यलं, असं आपलं पह्यलं ठरलं व्हतं कनाह्य ?"

'त्य मला काह्य बी माह्यत नाह्य.' त्यानं सरळ कानावर हात ठेवले. तो आणखी पुढं बोलला,

'आजपून मह्या मळईच्या वावरात जो पाय टाकील आन आंब्याच्या कैरीला हात लाईल, त्याचं हातपाय तोडल्याखिरी राह्यचा नाह्य. हां, उजून म्हणशील मला माह्यत नाह्य म्हनू.'

रांगडा हैबती असा आपल्या जातीवर जाईल, ही सोजूची कल्पना नव्हती, आणि हैबतीनं तर असा सोजूला इंगा दाखवला. बिचारा सोजू फुटक्या बेडकीगत भुई-सपाट झाला. रांगड्या हैबतीचं तो आता काहीच वाकडं करू शकत नव्हता.

म्हणून सोजूनं राहीला तिच्या नवऱ्या-कडं नेऊन घातलं तेव्हा खाली मान करून सांगितलं,

'जावाय, तुमाला झाड अंदाण म्हून भेटायचं नाह्य.'

'आँ ऽ' राहीच्या नवऱ्याच्या कपाळा-वर आठ्या उठल्या.

'वह्य, अत्ता त्या झाडाभोंती वाद उपाटलाय. आमचा नायलाज हाय पगा' सोजू खरं काय ते बोलला.

पण राहीच्या नवऱ्याला हे खरं कसं वाटणार ? लग्नात झाड आंदण द्यायच्या वेळी सासऱ्यानं घेतलेले आढेवेढे त्याला आठवले. म्हणून तो आता समजला की, आपला सासरा वेळ निभावून बसला. आणि आता फसवायला आला. तो आधीच हट्टी. त्यात सोजूचं हे प्रकरण ! सास-ऱ्याला जन्माची अद्दल घडवायचीच आणि शेंदऱ्या आंबा आंदण म्हणून मिळवाय-चाच, ही अटकळ त्यानं मनाशी बांधली.

म्हणून तर त्यानं मोठ्या नाटकीपणानं आपल्या सासऱ्याला माहुलच्या फाटचा-पर्यंत कसला सुगावा लागू न देता बोळ-वलं, आणि सकाळच्या पारीच त्यानं राहीभवती चांगलाच रहाडा केला.

दोन तीन दिवस असेच गेले. ह्या दोन तीन दिवसात सोजू पडाळीच्या बाहेर असा पडलाच नाही.

'आयकलं का ?' रुपी न राहवून बोलली.

'काह्य ?' सोजू उदासवाणी बोलला.

'अत्ता तुमी शेंदऱ्या आंबा राह्यच्या नवऱ्याला अंदाण म्हून दिवून टाका.'

'पर आपून कसं कोंडीत सापाड-लोय, तू ह्य पकतीस कनाह्य ?'

'पर जावाय बी समजुतदार नाह्य. त्यानं पोरीची जिंदगानी वाईट जाएल. तव्हा तुमी त्या काळतोंड्याक जावा.'

'आन त्यापं जाऊन काय करो ?'

'त्या मेल्याच्या पाया पडा. त्या राकिस हैबत्याला आली किंव त पव्हा.'

ज्याचं परत मुस्काड पाहू नये, अशा माणसाच्या पाया पडायचं म्हणजे–सोजू भडकला,

'जावय, ह्यवढा तटून बसला तर बसू दे.'

'मंक पोरीचं कसं व्हणार ?'

'राह्यल आपल्यापं. आजवर जशी संवाळली तशी संबाळू. गरीब आसलो त जड नाह्य ती आपल्याला.'

बापाचं हे बोलणं ऐकून राहीनं मान वळवली. पडाळीबाहेर रडत निघाली. सोजूनं तिला अडवलं, आणि तिच्या डोळ्यातलं पाणी पाहून त्याच्यातील अवसानच गायब झालं. तिला मायेनं थोपटीत बोलला,

'पोरी, आसी टिपं नको ढाळूस. तुह्यासाठी मी नरकात बी जाएल.'

सोजू हैबतीच्या घरी गेला तेव्हा तो आडदांड बाप्या आपल्या झाड तोडायच्या मोठ्या धारदार कुऱ्हाडीला दांडा घालीत होता. सोजूला आपल्याकडे आलेला पाहून तो चमकला. कुऱ्हाड घराच्या कोपऱ्यात ठेवून तो बोलला.

'सोज्या, मह्याक कह्याला आलास?'

'माही राही तिच्या नवऱ्यानं का हकाल्लीय, ह्य तुला माह्यताय् ना ?'

'वह्य, त मी सांगून ठिवतो, शेंदऱ्या आंबा मी देणार नाह्य.'

'पर न्येवानं चाल कनाह्य ?'

'न्येव पाह्यजी ओसन त कोर्टात जा. झुंदाय मी तयारह्य' त्याच्या त्या आव्हा-नानं सोजू जागच्या जागी कोलमडला. तोंडात मारल्यागत तो आपल्या पडाळी-कडं जाऊ लागला, तो त्याच्या डोळ्या-समोर राहीचं भवितव्य उभं राह्यलं. आणि त्याचं पाय जागच्या जागीच थब-कलं.

'हैबती, शेंदऱ्या आंबा मी इकात मागतला त देशील ?' सोजूनं नवाच तोडगा काढला.

हैबतीनंही मग सारासार विचार केला. बोलला,

'सोज्या, ह्य पह्य, मला बी बोटचाचा सित्या चंभार बैल इकतोय. मला पेरणी-साठी दुसरा नवा बैल हुबा करायचाय. मला बी पयश्याची गरजाह्य. तव्हा बोल मंक् झाडाची किंमत.'

'मालक तू. झाडाची किंमत मी कशी सांगू ?' सोजूनं वर्मी घाव मारला.

पण रांगड्या हैबतीचा ह्यात जन्म गेलेला. निर्लज्जपणानं तो बोलला.

'सोज्या, मालकानं सोताचा माल सोताच इकात घिवून आलीली रक्कम गिऱ्हायकाला देणं, मह्य जरा नयीनच नह्य का ?'

'वह्य.' सोजू तोंड कडवट करून बोलला.

'बरं सोज्या, बोल आंब्याची किंमत.'

'ह्य पह्य, त्वा मळईचं वावर साडे-नवश्याला घितलंस. लग्नाला म्या साडे सातसे की आठसे रुपय घालीवलं.'

सोजू दीडशे रुपयांशिवाय जास्त रक्कम देऊ शकत नाही, हे पाहून रांगड्या हैबत्यानं तोंड वेडंवाकडं केलं. सोजू सम-जला, हैबती एवढ्या थोड्या किंमतीत झाड द्यायला तयार नाही. त्यानं सोजू

अनुक्रमणिका







लाचार बनला. त्याने हैवतीचं पाय पकडलं. तो पाय सोडीनाच. हैवतीलाहि मग काय वाटलं कुणास ठाव. तो तयार झाला. सोजू उजळला. बोलला,

'तू आता शेंदऱ्या आंब्याखालीच य. तिथं मी तुहं पैसं देतो.'

सोजू पैसे घेऊन आंब्याखाली आला. हैवती त्याच्या आधीच तिथं येऊन बसला होता. त्याच्या हातात पैसे देऊन सोजू बोलला.

'ह्य प्ह्य, आपून शेतसरीत उभाह्य. अत्ता तरी दिला शब्द मोडू नकोस. आजपून झाडाव मालकी सांगू नकोस.'

'झाड अत्ता पार तुहंच. रोकडेसराची शप्पत.' हैवतीनं कधी नवस ते देवाचं नाव घेतलं. सोजू त्यानं फुलला.

आता सारी कटकट मिटली, ह्या विचारानं सोजूनं आब्यांकडं मोठ्या आनंदानं पाहिलं. त्याचवेळी रोगडा हैवती त्या झाडाकडं पाहून भयानकपणे स्वतःशीच हंसला. मग सोजूला तो बोलला,

'सोज्या, अत्ता ह्या झाडाचा मला मह्या वावरात आसून बी काह्य उप्योग नाह्य, नाह्य का?'

आणि ह्यावर तो परत कोणत्या तरी विचारानं भयानकपणं हंसला. त्याला असं हसताना सोजूनं कधी पाह्यलं नव्हतं. त्यानं तो थरकला...

दुसऱ्या दिवशी सकाळी सोजू, रुपी आणि राही देवनदीच्या नव्या पुलावरून साकूरमांडचाला चालले होते. त्यावेळी हैवती बोटचावरून सित्या चांभाराचा बैल घेऊन येत होता. सोजूची त्याच्यावरोबर वोलण्याची इच्छा नव्हती. अशा दुष्टाशी बोलायचं तरी काय?

'काह्यरे सोज्या, तुमी द्वागं लेकीला घेऊन तिच्या नवऱ्याकडं चालला जणू?'

'व्ह्य.' सोजूला बोलणं भाग होतं.

'मंक अत्ता तिकं किती दिस ऱ्हाणार?' तो दात विचकून बोलला.

'त्य पहूं तिकं गेल्याव.'

'मंक जावात. उजून तुमाला बोटचाव लॉकर यस्टी मिळायची नाह्य.' हैवतीनं त्याना फुटवलं.

रांगडा हैवती मग नवा बैल दामटीत आपल्या पडाळीकडे आला. बैल गव्हाणीला कसा वसा वांधून तो घरात घुसला. आणि मग त्यानं घराच्या कोपऱ्यात असलेली झाडं तोडायची मोठी धारदार कुऱ्हाड दोन्ही हातांनी पेलली. मग त्याला तिथं उभं राहवलं नाही.

तो झपाटल्यागत शेंदऱ्या आंब्याच्या रोखानं पळत सुटला.

●



दीपावली मासिकाचे आजच वर्गणीदार व्हा!










# साहित्य सम्मेलनाध्यक्ष

## प्राचार्य पु. शि. रेगे



**अस्सल** कलानिर्मितीत लोकप्रियता निरपेक्ष सृजनाला मूलभूत महत्त्व आहे. कलाकाराचे स्वातंत्र्य आणि कलेची मौलिकता ही अबाधित व शुद्ध केवळ यामुळेच राहू शकतात. विख्यात कादंबरीकार एमील झोला आणि प्रसिद्ध चित्रकार पॉल सिझान हे दोघे कलेच्या क्षेत्रातले एके काळचे जिवाभावाचे मित्र पुढे ज्या कारणामुळे दूर झाले तो इतिहास या संदर्भात अतिशय अन्वर्थक व उद्बोधक आहे. कलानिर्मितीच्या मूळ भूमिकेपासून एमील झोला पळत आहे हे दिसताच पॉल सिझानने झोलास समज दिली आणि प्राणापलीकडे प्यार असलेल्या कला तत्त्वाकरता संबंध तोडले. आज एमील झोलाच्या साहित्याचे आवाहन् उत्कट राहिले नाही आणि जसे दिवस जातील तसे एक लेखक या ऐतिहासिक नोंदीपलीकडे त्याच्या साहित्याचे मोल जाणवणार नाही. उलट तडजोड लाथाडून आपल्या कलेशीच इमान राखणाऱ्या पॉल सिझानची चित्रे आजच नव्हे तर पुढेही सतत आपल्या सौंदर्याने रसिकाना स्पर्शत राहतील. मराठी साहित्यात पु. शि. रेगे यांच्या संथ, अखंड आणि स्वतःच्या मस्तीच्या साहित्य लेखनाकडे पाहिले म्हणजे पॉल सिझानच्या निर्भेळ कलानिर्मितीची आठवण होते.

यंदा पु. शि. रेगे यांची साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून निवड झाल्याचे कळताच, आपल्या साहित्य संस्था सुधारल्या की रेगे विघडले असा व्रात्य विचार मनात प्रथम आल्याशिवाय राहिला नाही. कारण साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद हेही इतर व्यावसायिक व राजकीय क्षेत्राप्रमाणे कारस्थाने, गटबाजी, प्रचार व जाहिरातबाजीच्या अनिष्ट पद्धतीने मार्गस्थ होत चालले होते. ज्यानी प्रामाणिकपणे आणि सातत्याने साहित्याची बहुमोल सेवा केली अशी माणसे मागे राहिली. आपल्या साहित्याचा गाजावाजा करणारे किंवा आपल्या साहित्यनिर्मितीचा आपल्या करिअरला व्यावसायिक उठाव मिळावा म्हणून हे पद प्राप्त करण्याचे प्रयत्न फलद्रूप झाले हे त्याच साहित्याच्या दृष्टीने फार आक्षेपार्ह होते. कदाचित् साहित्य परिषदानाही यातील अन्याय्य सदोषता जाणवली असावी व त्यानी अध्यक्ष निवडण्याची रीतच बदलली. श्री. पु. शि. रेगे यांच्या निवडीने ही नवी रीत निर्दोष आहे हे जे सिद्ध झाले ते पुढील इतिहासात अपवादभूत ठरू नये म्हणजे झाले.

श्री. रेगे यानी समीक्षा, काव्य, कादंबरी, कथा आणि नाटक इतके साहित्य प्रकार निर्मिले. या सर्व प्रकारात त्यांची कला शुद्ध ठेवण्याची वृत्ती व शैलीही सुसंगतपणे व्यक्त झाली. साहित्याच्या कोणत्याही एका प्रकाराला लोकप्रियता किंवा व्यावसायिक यश लाभते म्हणून त्यानी केव्हाही त्याचे भांडवल करून भराभरा व विपुल लेखन केले नाही. प्रथम ललित लेखनाची लोकप्रियता, त्या लोकप्रियतेचा गैरफायदा घेऊन मागणी तशा पुरवठ्याचे धारणाहीन लेखन, अशा ललित साहित्याला उतरती कळा आल्याने स्वतःच्या नावाचा फायदा घेऊन कॉलेजोपयोगी समीक्षा असा अधोगत आलेख श्री. रेगे यांच्या साहित्य-निर्मितीच्या बाबतीत आढळत नाही.

अनुभव, जगण्याचे सूत्र व त्यामागचे तरलत्व हे नेमके हेरावयाचे आणि ते अचूक शब्द संपदेत गुंफायचे याचा वेध श्री. रेगे याना सारखा लागलेला असावा. लेखनात व्यक्ती, प्रसंग, नाती आणि शब्द यांच्या बाबतीत अतिशय जागरूकता ते बाळगतात. चुकूनही भाष्यवजा वाक्य किंवा वर्णन येऊ देत नाहीत. त्याचप्रमाणे कमालीचे अलिप्त असलेले ताटस्थ्य त्यांच्या साहित्यात आविष्कृत होते. आपली कृती ते कणाकणाने आणि निवडक व मोजक्या शब्दातून बांधतील. शेवटाकडे धाव घेणाऱ्या घसरत्या वाचकाना त्यांची कृती आकळणे अशक्य

श्री. रेगे यांचे काव्य, नाटक, कथा आणि कादंबरी ही इतकी स्वतंत्र व स्वयंपूर्ण आहेत की, त्यांची तुलना इतर साहित्याशी जशी होऊ शकत नाही त्याचप्रमाणे त्याचे कुणाला सहजासहजी अनुकरणही करता येणार नाही. श्री. रेगे यांचे काव्य नवकाव्यात गणले गेले आणि त्यांच्या कादंबरीला सरकारी पारितोषिक मिळाले. एवढे दोष सोडले तर त्यांच्या साहित्याची अभिज्ञातता प्रश्नातीत व वादातीत आहे. 'मी' साहित्यात आल्याने कलेच्या दृष्टीने मारक ठरते या त्यांच्या मताशी सहमत होता येत नसले तरी त्या संबंधातले त्यांचे निवेदन व मुद्दे संयुक्तिक असतात. साहित्य निर्मितीत त्या त्या व्यक्तीची अस्मिता अविभाज्यपणे निगडीत असते हे त्याना नाकारता येण्यासारखे नसले तरी साहित्य शुद्ध राखण्याच्या दृष्टीने 'मी' दूर राहिला तर जी अवधानता येते ती साहित्याला पूरक ठरते हे मात्र मान्य करावेच लागते. रंग पांचालिक (इतर) सावित्री, अवलोकिता व त्यांच्या कृती वाचताना अलीकडे एक मात्र मला जाणवते,






वाटते की लेखक कलेच्या हव्यासापायी श्री. रेगे यांच्या रचनेत अति सफाईचा दोष येत चालला आहे. काव्यात साधना, फुलोरा, हिमसेक, दोला, गंधरेखा आणि नंतर प्रसिद्ध झालेल्या काव्यात तुलनेने बोलायचे झाल्यास, 'पुष्कळा' या संग्रहातल्या कविताच मला अधिक आवडल्या.

श्री. रेगे यांची साहित्य निर्मिती ही जशी लोकप्रियता निरपेक्ष आहे तसेच त्यांचे साहित्यप्रेम अर्थ निरपेक्ष आहे. साहित्याचा विचार कलामूल्याच्या निकषावर, डोळस इतिहासाच्या संदर्भात आणि जागतिक बैठकीवर वस्तुनिष्टतेने व्हावा असे त्याना तीव्रतेने वाटत असावे. यासाठी आर्थिक झीज सोसून स्वतःच्या जबाबदारीने त्यानी 'छंद' नावाचे जे दर्जेदार द्वैमासिक काढले व चालवले त्याला तोड व उदाहरण नाही. त्याचप्रमाणे साहित्याचा स्रोत, साहित्य संपर्क व संवादामुळे संवर्धित होतो व गतिशील राहतो म्हणून साहित्यिकाना एकत्रित आणण्याकरता त्यानी 'एकंदर' च्या बैठकी आपल्या घरी आयोजिल्या. तीस ते चाळीस लेखकाना आपल्या घरी आदरातिथ्याने पाचारिले. बऱ्याच जणाना ते आयतेच एक गप्पा मारण्याचे साधन उपलब्ध झाले असा माझा ग्रह झाला. श्री. रेगे यांचे साहित्य आणि साहित्यिकांबद्दलचे प्रेम व साहित्य निर्मितीला अनुकल वातावरण देण्याची धडपड ही भूमिका पूर्णपणे लक्षात घेतली जात नव्हती असे अजूनही वाटते. कदाचित् यामुळेच पुढे 'एकंदरी'च्या बैठकी झाल्या नसाव्या. पण बैठकी झाल्या नाहीत तरी श्री. रेगे यांची साहित्याची बैठक अविचलित राहिली यात मराठी साहित्याचे आशास्थान जगले आहे. सुमार अध्यक्षीय भाषणांच्या मालिकेत रेगे यांचे अध्यक्षीय भाषण त्यांच्या इतर साहित्याप्रमाणे काहीतरी वेगळे व मौलिक देणारे ठरेल, आणि त्याचीच चातकासारखी प्रतीक्षा साहित्यप्रेमी करीत राहतील.

**—दा. गो. देशपांडे**

---

[ पान ४६ वरून—**कुटुंबनियोजन** ]

विशिष्ट पद्धतीबाबत सक्ती करण्याचा प्रश्नच येत नाही. आपापल्या गरजांनुसार वेगवेगळ्या प्रमाणात परिणामकारक ठरणाऱ्या पद्धतींची निवड ते स्वतःच करू शकतात. निरोध ( कंडोम )-चा अपवाद सोडला तर शस्त्रक्रिया, लूप वा गोळ्या या साधनांच्या वापराने अधिक उत्साहवर्धक निष्कर्ष आढळून येतील.

या कुटुंब कार्यक्रमात सन १९७६—७७ पर्यंत जनन प्रमाण घटवावे असे लक्ष्य ठरविलेले असून ते गाठण्याची त्वरा आहे. या कालावधीकडे आम्ही दुर्लक्ष करू शकत नाही. कारण तसे झाले नाही तर आमच्या अर्थव्यवस्थेची व विकास कार्यक्रमाची भरून न येणारी हानी होण्याची शक्यता आहे. देशात सामाजिक परिवर्तन घडवून आणण्याचा व विशिष्ट मुदतीत पुरा करावयाचा हेतू बाळगून चालविलेला विशेष स्वरूपाचा हा प्रयत्न होय.

अशा कार्यक्रमाची योजना खात्रीची व परिणामकारक असणे आवश्यक असते. जर पुरवठा कार्यात खंड पडला किंवा सेवा कार्यास उशीर झाला तर त्यामुळे मोठी हानी होण्याची शक्यता असते. तसेच लोकांचा विश्वास ढळण्याचाही संभव असतो. याच कारणामुळे कर्मचाऱ्यांचा संच सदैव तत्पर व कार्यशील ठेवावा लागतो. हे शक्य व्हावे म्हणून जनसंपर्क साधणे व व्यापारी तंत्र उपयोगात आणणे यांचा अवलंब केला -.तो. वैद्यकीय व सार्वजनिक आरोग्य कामात आम्ही अशा तऱ्हेने नवा पायंडा पाडीत आहोत.

आम्ही बरेच यश मिळविलेले असले तरी प्रशिक्षण, संशोधन व मूल्यमापन या क्षेत्रात या कार्यक्रमास मर्यादा पडतात. १,२५,००० प्रशिक्षित कर्मचाऱ्यांची गरज असताना प्रशिक्षण कार्यक्रम पूर्ण होण्याची वाट पाहाता येत नाही. दोन्ही गोष्टींसाठी एकदम प्रयत्न केले पाहिजेत. विशेषतः प्रशिक्षण संस्था उभारण्यासाठी लागणाऱ्या कालावधीमुळे प्रशिक्षण क्षेत्रातील आपली प्रगती बंद आहे. आज प्रशिक्षण देणारी ४६ केंद्रे असून त्यातील प्रशिक्षित होणारे कर्मचारी या कार्यक्रमासाठी उपयुक्त ठरतील. संशोधन क्षेत्रात २१ केंद्रातून संशोधन कार्य केले जात असून त्याचे निष्कर्ष कार्यक्रमातील कार्यक्षमता टिकविण्यासाठी वापरले जातात. नव्या संशोधनासाठी नवीन प्रश्नही त्या केन्द्राकडे पाठविले पाहिजेत.

कार्यक्रमाच्या अंमलबजावणीमुळे २० लाख मुले होण्यास प्रतिबंध बसला. याच गतीने प्रगती होत राहिली तर १९७६—७७-पर्यंत दरवर्षी १.२५ कोटी बालकांच्या जन्मास आळा बसू शकेल.

**पुढील जबाबदारी**

सध्या करण्यात आलेली प्रगती दृढ करणे ही प्राथमिक जबाबदारी आज आमच्या समोर आहे. प्रशिक्षण व कार्यक्रमाचे मूल्यमापन त्याचप्रमाणे आकडेवारी संकलीत करण्यासाठी यंत्रणेस चालना देणे या गोष्टींवर भर देणे आवश्यक आहे. आमच्या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीमुळे लोकसंख्येत कस कसा फरक पडतो यावर बारकाईने लक्ष ठेवणेही अधिक महत्त्वाचे आहे. लक्ष्य गाठण्याची मर्यादा १९७६—७७ पर्यंत असली तरी अधिक चांगला प्रशिक्षित कर्मचारी वर्ग, मिळविलेला अनुभव व शासन यंत्रणेतील कार्यक्षमता यामुळे कार्यक्रमाची गती वाढेल व नियोजित कालमर्यादेपूर्वीच जननप्रमाणात घट व्हावी हे उद्दिष्ट साध्य होऊ शकेल.

आम्ही सर्वतोपरी प्रयत्न करीत आहोत. परंतु हे प्रयत्न पुरेसे नाहीत. आम्हाला आमचे प्रयत्न दुप्पट आणि चौपट केले पाहिजेत. निर्धारीत लक्ष्ये नियोजित काळात गाठली पाहिजेत. यात अपयश क्षम्य ठरणार नाही. कारण निधी, मनुष्यबळ किंवा साहित्य यांचा तुटवडा नाही. आजवर केलेली प्रगती, उपलब्ध निधी आणि ठरविलेल्या योजना यांच्या बळावर आपण लोकसंख्येचा प्रश्न सोडवू शकू.

●●●

अनुक्रमणिका

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment OCTOBER 1968

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay-4